— खानदेशी भाषा मंडळ —

पुष्प ९ वें.

# अहिराणी ध्वनिपरिचय

: लेखक :

दा. गो. बोरसे

एम्. ए. एल्एल्. बी. एम्. एड्. डी. बी. एड्.

तर्खडकर सुवर्णपदकधारी,

सदस्य महाराष्ट्र लोकसाहित्य समिति.

मूल्य १॥ रु.

: प्रकाशिका :

सौ. सुशीलाबाई बोरसे

गिरजा साहित्य भांडार

आझाद चौक, मालेगांव [जि. नाशिक]

: मुद्रक :

व. ना. वेंडाळे

विद्याभूषण प्रिंटींग प्रेस, मालेगांव.

जिनें स्वतःच्या सुवर्णालंकाराची पर्वा न
करतां ध्वनिशास्त्राचा अभ्यास
करण्यासाठीं मला सतत
प्रोत्साहन दिले त्या
माझ्या प्रिय
पत्नीस
हा
— ध्वनि-अलंकार —
अर्पण

# — प्रस्तावना —

खानदेशी भाषा मंडळाचें हें नववें पुष्प सादर करतांना मला आनंद होत आहे. तत्पूर्वी अनेक अडचणींच्या दिव्यांतून मला जावें लागलें व पुष्पाच्या पाकळ्यांतहि बरीचशी छाटाछाट करावी लागली. अहिराणीची वर्णप्रक्रिया सविस्तर सादर करण्याचा हेतू आर्थिक साह्याच्या अभावीं बाजूला ठेवावा लागला. व त्याचा एकच भाग फक्त रसिकांना सादर करतां येणें मला शक्य झाले. आतांपर्यंत स्वतःच्या जबाबदारीवर महाराष्ट्रांतील या उपेक्षित ग्रामीण भाषेसंबंधानें संशोधनपर लिखाण प्रसिद्ध करूं शकलो. तथापि यापुढें पुणें, नागपूर अगर मुंबई विद्यापीठासारख्या संस्थेच्या साह्याशिवाय अगर अन्य प्रभावी संस्थेच्या मदती शिवाय माझ्यासारख्या सामान्य एकांडी शिलेदारास अतःपर संशोधन कार्याचा गाडाच रेटतां येणें अशक्य आहे. त्यामुळें अहिराणीची घटना, मराठीच्या ग्रामीणभाषा, ग्रामीणभाषा कोश, लोकभाषा व साहित्य, लोकवाङ्मयाचें शैक्षणिक महत्त्व ध्वनिशास्त्राचें शैक्षणिक महत्त्व, कानबाई, कथामोसम इत्यादि भाषा संशोधनपर व [illegible]धीन तयार व संकलित ग्रंथ यापुढें मी स्वतः प्रसिद्ध करूं शकणार नाहीं. [illegible] आर्थिक परिस्थितीकडे दृष्टिक्षेप करून रसिकांनीं मला या माझ्या निर्णयाबद्दल संशोधनपर प्रसिद्धिकरण आंतबट्ट्याचा व्यवहार असतो ही वस्तुस्थिति लक्षांत घेऊन मला मनःपूर्वक क्षमा करावी व आतांपावेतों मी केलेली सेवा गोड मानून घ्यावी ही विनंती आहे.

सदर पुस्तक ग्रामीण भाषेतील ध्वनींचा परिचय करून देण्याच्या दृष्टीनें व ध्वनिशास्त्राच्या अभ्यासांतील माझ्या उणिवा समजून घेण्याच्या दृष्टीनें प्रकाशित करीत आहे. महाराष्ट्र परिसरांतील ग्रामीण भाषेचें ध्वनिशास्त्रदृष्ट्या विवेचन केलेलें हें मराठीतील पहिलेंच पुस्तक आहे. रसिकांना माझा हा प्रयत्न आवडेल अशी अपेक्षा आहे.

डेक्कन कॉलेजातील भाषाशास्त्रीय वर्गाचे डॉ. कत्रे, डॉ. चतर्जी, डॉ. सुकुमार सेन, डॉ. मेहेंदळे इत्यादि प्राध्यापकांच्या ज्ञानानुग्रहाचा उल्लेख करणें अवश्य आहे.

पुस्तकाचें मूल्य जादा आहे. तथापि त्यामागील संशोधनासाठीं करावा लागणारा खर्च लक्षांत घेतां ही किंमत अल्प आहे. शिवाय प्रतिसंख्याहि मर्यादित (२००) आहे.

मराठींत पुस्तक लिहितांना परिभाषिक शब्दांची ध्वनिचिन्हांची उणीव तीव्रतेनें भासली. पुस्तकाची छपाईहि जशी पाहिजे तशी झाली नाहीं. तथापि हे कांटेखराटे रसिकांना जाणवणार नाहीं अशी योग्य ती खबरदारी मी घेतली आहे.

या कार्यास प्रोत्साहन देणाऱ्या आमच्या लोकसाहित्य समितीचे अध्यक्ष चिं. ग. कर्वे यांच्या सारख्या माननीयांचा व इतर अनेक सुहृदांचा मी ऋणी आहे. रसिकांनीं व संस्थांनी उत्तेजन दिल्यास मी केव्हांहि सेवा करीन. अशी संधि द्यावी हीच महाराष्ट्रांतील रसिकांना विनंति आहे.

— दा. गो. बोरसे.

# अहिराणीची वर्णप्रक्रिया

## १ ध्वनिविचार.

अहिराणी ही एक संयुक्त महाराष्ट्रांतील वऱ्हाडी, कोंकणी, मावळी, माणदेशी डांगी प्रमाणेंच पूर्वपश्चिम खानदेश, नाशिक, डांग व मराठवाड्याचा थोडासा भाग यांत आजहि बोलली जाणारी ग्रामीण भाषा आहे. कोणत्याहि ग्रांथिक भाषेपेक्षां या ग्रामीण बोली भाषा जास्त विकसनशील असतात. मानवी प्राणी हा ज्याप्रमाणें माकडापासून वा आदिमानवापासून उत्क्रांत होत होत आजच्या दशेस प्राप्त झालेला आहे, त्याचप्रमाणें चालू भाषांनाहि निरनिराळ्या अवस्थांतून जावें लागून आजचें स्वरूप प्राप्त झालेलें आहे. या भाषांच्या वाक्प्रचारांत, शब्दांत, लोकवाङमयांत त्यांच्या ह्या निरनिराळ्या अवस्थांचे ठसेहि या भाषा अभ्यासिल्यास दृष्टोत्पत्तीस येतात. कांहीं ग्रामीण भाषांना राजाश्रयामुळें, विद्वान लेखक कवींच्या पाठबळामुळें उत्कर्षाचे दिवस लाभलेले आहेत तर कांहींना या जगांतून नामशेषहि व्हावें लागलेलें आहे. अहिराणीच्या भवितव्यांत उत्कर्ष असो वा अपकर्ष असो, तथापि तिच्यांतील अलिखित अशा उत्तम लोकवाङमयाचें दर्शन, म्हणी व वाक्प्रचारांचें संकलन तिच्या वर्णप्रक्रियेचें, रूपप्रक्रियेचें, अर्थप्रक्रियेचें वास्तव दर्शन मराठी, गुजराती, हिंदी व महाराष्ट्र परिसरांतील आणखी कांहीं ग्रामीण भाषा यांच्याशीं केलेलें तुलनात्मक वर्णन, संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश यांच्यापासून वारसाहक्कानें मिळविलेल्या बाबींचें चिंतन महाराष्ट्रांतील ग्रामीण भाषांच्या अभ्यासकांस व भाषा-शास्त्राच्या संशोधकांस व चाहत्यांस निश्चितच उपकारक ठरेल.

कोणत्याहि जिवंत भाषेचा अभ्यास करतांना ध्वनींचा प्रामुख्यानें विचार करणें अत्यावश्यक आहे. या बोलीभाषांपैकीं ज्या भाषा लिपिनिविष्ट झालेल्या असतील त्यांचा ध्वनिपरिवर्तनाच्या दृष्टीनें कालिक अभ्यासहि सुकर होतो. तथापि लिपिनिविष्ट भाषा होणें हें केव्हां केव्हां योगायोगावर अवलंबून असते. तथापि बोलीभाषेच्या अभिमान्यांनीं मनांत आणल्यास व प्रयत्न केल्यास अगर राजाश्रय लाभल्यास अगर विद्वानांनीं पुरस्कार केल्यास या बोलीभाषांतील प्रमुख ध्वनी लिपींच्या द्वारां साकार बनूं शकतात. कांहीं भाषांनीं आपलें वाङमय चिरंतन टिकविण्यासाठीं अन्य संस्कृतीच्या लोकांच्या लिपींचाहि स्वीकार केलेला आहे, असें आपणास लिपींच्या इतिहासावरून दिसून येईल. चिनी भाषेनें तर ध्वनिदर्शक लिपीचिन्हांऐवजीं बोधचित्रांचाच लिपीप्रमाणें उपयोग केलेला आहे. लिपी-ऐवजीं बोधचित्रें हीं कितीहि समर्पक असलीं तरी विज्ञानामुळें वाढत्या नववस्तू निर्मितींना व सृष्टींतील असंख्य वस्तूंना चित्रद्वारां- लिपींत स्थान देणें महा जिकीरीचें व कटकटीचें काम होईल. शिवाय वस्तू चित्रद्वारें समजतात तरी. पण भावना, कल्पना, विचार चित्र-

द्वारें समजावून देणें कठीणच. त्यामुळें ध्वनिनिदर्शक लिपीचिन्हांचा संकेतानें ठरविलेला वापरच सुकर व व्यवहार्य ठरलेला आहे.

लिपी हें ध्वनी साकारित करण्यानें सुलभ साधन आहे. स्वरलहरींच्या आंदोलनानुसार ग्रामोफोनच्या रेकार्डसूवर रेषावलयें लिहिली जातात व पुनश्च हीं वलयें तेच ते ध्वनी निर्माणहि करूं शकतात. यांत पूर्णपणें ध्वनी कह्यात आणलेले असतात. तथापि अशा रेषावलयांकित लिपीचा शास्त्रज्ञाशिवाय सामान्य लोकांना उमज पडणार नाहीं व व्यवहारांतहि दररोजच्या भाषणाच्या अशा असंख्य ध्वनिमुद्रिका तयार करता येणें अशक्य आहे. यासाठीं लिपींचा आश्रय घेणेंच आज व्यवहार्य व उपयुक्त ठरलें आहे आकाशातील तळपणाऱ्या विजेचा साक्षात्कार ज्याप्रमाणें आपणास तांब्याच्या तारेंतून होऊं शकतो, पुष्पांचा सौरभ अत्तराच्याद्वारें मिळतो, दिवंगतांचे दर्शन चित्राच्या द्वारे घडतें तसेंच भाषेंतील ध्वनींची स्मृति लिपींतील वर्ण देऊ शकतात. मात्र भाषेंतील सर्वच ध्वनींची कल्पना आणून देण्यास लिपीतील वर्ण असमर्थ असतात. महाराष्ट्रांतील तालव्य ( वस्तुतः वर्त्स्य ) व दन्ततालव्यासाठी आजहि आम्ही च, छ, ज, झ हींच चिन्हें वापरतो. पहाडी व नगरी 'झंकारी' लुंठित ( TRILLED ) र् बद्दल व खानदेशी उत्क्षिप्त ( FLAPPED ) र् दर्शविण्याचें काम 'र' हें एकच चिन्ह आहे. हाच र् पुन्हां संस्कृतांतील मूर्धन्य र् दर्शवितो व डांगी कोंकणींतील ड बद्दल येणारा र् हि दर्शवितो. आवळी ब्यॅल, त्यॅल, प्वॉट, ग्वॉड या नव्या ध्वनींना स्वतंत्र लिपीचिन्ह नसल्यानें आम्ही अजूनहि तेल, पोट, गोड असें वस्तुतः ग्रामीणांचे उच्चार नसतांनाहि वापरतो. अहिराणी य् ( ळ एवजीं येणारा ) तालव्य य पेक्षां भिन्न असूनहि नेहमीच्या य नेंच दर्शविला जातो. संस्कृत ळ्, मराठी ळ् व पावरी भिल्लींतील ड्र् बद्दल येणारा ळ् यांचीं उच्चारस्थानें भिन्न असतांनाहि ळ् हेंच सर्वसामान्य चिन्ह वापरलें जातें. चिंच यांतील दुसरा च हा मराठींत दन्ततालव्य असूनहि आम्ही चिन्च असा शब्द लिहिल्यास चूक मानला जातो. सिंह, कंस, संसार, संशय हे शब्द उच्चारतांना ओष्ठ्यवर्णाचा उच्चारांत आसरा घेत असून त्याचा आम्ही लिखाणांत निर्देश करीत नाहीं. कित्येक अनुनासिकें अनुच्चारित असूनहि लिखाणांत मात्र आम्हास वापरावे लागतात. ग्रांथिक भाषेंतील दररोजच्या शब्दांचे उच्चार बदललेले असूनहि आम्ही पन्नास वर्षांपूर्वी केलेले तसे उच्चार बोलतांना प्रचारांत नसतांनाहि शुध्दलेखनाचे नियम घोकतो.* आज मराठी लिपी व्यापक करण्याची आवश्यकता आहे. नवीन लिपीचिन्हें नव्या ध्वनीसाठीं वापरण्याची जरूरी आहे. भाषा ध्वनीसमुच्च-

---

* मराठींत केवळ हीं उणीव नसून इंग्रजी सारख्या राजमान्य भाषेंतहि ही उणीव आहे. Camel, Calm, Cane इत्यादि शब्दांत 'a' असूनहि उच्चार मात्र भिन्न आहे. त्यामानानें मराठींत उच्चारानुसारी लेखन जास्तींतजास्त करतां येते असा निर्वाळा पाश्चात्यांनीं देखील दिलेला आहे.

यांनी बनलेली असल्यानें नेमका अर्थ सभाषिकांनाच काय पण आपली भाषा शिकणाऱ्या परकीयांनाहि कळण्यासाठी भाषेंत अस्तित्वांत असणाऱ्या सर्व ध्वनींचीं प्रतीकात्मक चिन्हें लिपींत समाविष्ट करणें अत्यावश्यक आहे.

पिण्डे पिण्डे मतिर्भिन्ना हें जसें खरें तसेंच व्यक्तीव्यक्तीचे ध्वनि हे देखील भिन्न असतात. इतकेंच काय पण व्यक्तीनें एकावेळेस उच्चारलेले विशिष्ट शब्दांचे ध्वनी हे दुसऱ्या वेळेस उच्चारलेल्या त्याच शब्दांच्या ध्वनीपेक्षां भिन्न असतात. परिवर्तन हाच बुद्ध-तत्वज्ञानाचा नियम लागू पडतो. या सर्वांना लिपिनिविष्ट करणें महाजिकीरीचें काम होईल व व्यवहारांतहि गोंधळ माजेल. भाषा ही सामाजिक संस्था असल्यानें इतकें व्यक्ति-स्वातंत्र्य देणें उचित नाहीं. व्यक्तीला स्वतःच्या आणि आपल्या समाजाच्या राष्ट्राच्या कल्याणासाठीं परंपरेनें चालत आलेले व भाषांच्या बाबतींत ठरलेले संकेत पाळावेच लागतात. सर्व साधारणपणें सर्वांच्या मुखीं असणाऱ्या व सर्वांना अवगत असणाऱ्या अर्थ-वाहक ध्वनींना विशिष्ट नियमांनीं संकेतांनीं कह्यांत आणून लिपिनिविष्ट करणें हाच एक सुलभ मार्ग आहे. मानवांच्या या प्रयत्नांनीच आपणास पूर्वजांचा अमोल असा बौध्दिक सांस्कृतिक व वाङमयीन ठेवा लाभला आहे. लिपींच्या अक्षरांनीं तो "अक्षर" बनलेला आहे. लिपीचें हें सामर्थ्य जाणूनच महाराष्ट्रांतील ग्रामीण भाषांतील अलिखित उत्तम वाङ्मयाला, प्रत्यहि बोलीभाषेंतील बोलल्या जाणाऱ्या ध्वनींना ग्रांथिक भाषेच्या शब्दांनीं पैलू पाडून व लिपीचें कोंदण देऊन सतेज टिकाऊ बनविणें अत्यावश्यक आहे, असें कर-ण्यानें मराठीचें वैभव दुणावेल. एकाच मांसपिंडाच्या हाडामांसाच्या बहिणीबहिणी फारा दिवसांनीं भेटल्यावर जो आनंद होतो, तसाच आंनद या महाराष्ट्रांतील ग्रामीण भाषांचें ग्रांथिक भाषेशीं असणारें साम्य सांस्कृतिक वैचारिक संबंध पाहून होईल. अशा रीतीनें परस्परांत जिव्हाळा निर्माण होईल व ग्रामीण भाषांना ग्रांथिक भाषेचें पाठबळ लाभेल व ग्रांथिक भाषानंदहि या ग्रामीण भाषा सरितांनीं समृध्द होईल.

कोणतीहि भाषा आत्मसात करणें झाल्यास भाषेंतील ज्या ध्वनींनीं तिला मूर्त असें बोली स्वरूप आलेलें असतें; तें समजावून घेणें अत्यावश्यक असतें. लिखित वाङ्मयाच्या द्वारां कोणत्याहि भाषेशीं ओळख करून घेणें, हा सुकर मार्ग जरी असला तरी तो गौण मार्ग आहे. प्रचलित बोलीभाषांची खरी ओळख त्या भाषेंतील ध्वनींच्या अभ्यासानेंच होऊं शकते; व अशी ओळख करून घेणें सुलभहि जाते. कांहींहि अक्षर ओळख नसतांनाहि विभाषिक लहान लहान मुलें एकमेकांच्या भाषा किती तरी लवकर आत्मसात करतात. पाश्चात्यांनीं ध्वनींच्या अभ्यासाचें मर्म लक्षांत घेऊनच ध्वनिशास्त्राच्या विशिष्ट अभ्यासानें निग्रोंच्या चित्कारी भाषा आत्मसात केलेल्या आहेत. भाषेंतील ध्वनींची सशास्त्र ओळख करून घेतल्यावर, त्या भाषेंतील लिखित वाङ्मय वाचण्यासहि विशेष अडचण पडत नाहीं; अगर 'न तेन लिखितम्' सारखी संदर्भ कळल्यावर संभ्रमाचीहि स्थिति रहात नाहीं. हा

ध्वनींचा अभ्यास वर्णनात्मक भाषाशास्त्राभ्यासास व तौलनिक अगर ऐतिहासिक भाषाभ्यासास पूरकच ठरतो व एकदां ध्वनिशास्त्राविषयीं आवड निर्माण झाल्यावर भाषाभ्यासी स्वतंत्र रीतीनें संशोधन करूं शकतो.

भाषेंतील कोणताहि बोल ( Speech sound ) हा (१) वाक्करण वा ध्वनियंत्रें (२) ध्वनिलहरींचें आंदोलन (३) श्रुतिक्षमता यांवर अवलंबून असतो. ध्वनियंत्रांनीं ध्वनिनिर्मिति होते. ध्वनिलहरींच्या आंदोलनांनीं ध्वनीची हृति होते. श्रुति क्षमतेनें ध्वनि श्रुत होतात. त्यामुळे ध्वनियंत्रद्वारां प्रगट झालेला बोल आपणास त्वरीत ऐकू येतो. व सभाषिकास त्यांचा अर्थहि तत्क्षणींच उमजून त्याप्रमाणें त्याच्याकडून ध्वन्यार्थानुसार अभिप्रेत अशा अगर प्रसंगी विरोधी क्रिया घडतात. भाषा हा परंपरागत वारसा असल्यानें सभाषिकांना भाषाविषयक संकेत अवगत असतात व हे संकेत इच्छा असो वा नसो व्यक्तिस्वातंत्र्यास वाव नसल्यानें पाळावेहि लागतात. भाषेंतील विशिष्ट ध्वनिसमुच्चयांनीं विशिष्ट वस्तू वा विशिष्ट भावना प्रतीत होते हे अशा संकेतांच्या योगानेंच आपणास समजते. शरीररचनाज्ञान हा जसा वैद्यकशास्त्राचा पाया आहे, भूमितीचें ज्ञान हा जसा शिल्प वास्तु शास्त्राचा पाया आहे, विविध शस्त्रास्त्रांचें वापराचें ज्ञान हा जसा रणविद्येचा पाया आहे, तसेंच ध्वनिज्ञान हा भाषाशास्त्राचा पाया आहे.

भारतीय ध्वनिवेत्त्यांनीं ध्वनिशास्त्राचा जितका सखोल अभ्यास केला, तितका अभ्यास गेल्या शतकापर्यंत पाश्चात्यांनीं केलेला नव्हता. ध्वनिनिर्मिति कशी होते, करण–संपत्ति कोणती, स्वर स्वतः प्रकाशणारे कसे व व्यंजन स्वराश्रयी कसे, घोष अघोष यांतील भेद कोणता, कंठ्य, तालव्य, मूर्धन्य, दन्त्य ओष्ठ्य व्यंजनें हीं नांवें कशीं पडलीं. संवृत, विवृत, प्लुत स्वर म्हणजे काय ? यांचा विचार भारतांत वेदरचनेपासूनच झालेला आहे. बुध्द, पाणिनी, पतंजली, वररुचि यांनीं आपल्या ग्रंथांत एतत्संबंधीं केलेलें विवेचन ध्वनिशास्त्राच्या भारतांतील प्रगतीविषयीं ग्वाही देतात. गेल्या शतकांत संस्कृत वाङ्मयाच्या अभ्यासानें व संस्कृत लॅटिन, ग्रीक इत्यादि भाषांच्या तुलनात्मक अभ्यासानें भाषाशास्त्राभ्यासास युरोपांत जशी सुरवात झाली तशीच ध्वनींच्या अभ्यासासहि सुरवात झाली. ब्रूक, स्वीट, बॉप, रास्कग्रि मॅक्समुल्लर, ग्रिम, व्हर्नर ग्रासमन, सोसूरे ग्राघा मेये इत्यादि ग्रंथकारांनीं परिश्रमानें ध्वनिशास्त्रांतील उत्सर्ग शोधून काढले. हल्लीं अमेरिकेंत तर वर्णनात्मक भाषाभ्यासास जी चालना मिळाली त्याचें श्रेय पाईक, नायडा, सापीर इत्यादि ग्रंथकारांना आहे. ध्वनिशास्त्र आतां विशिष्ट भाषेंतील ध्वनिपुरतेच मर्यादित राहिले नाहीं. अर्थनिरपेक्ष अशा ध्वनिशास्त्राचाहि सखोल अभ्यास चाललेला आहे. स्वरलहरींच्या लांबीरुंदीच्या मोजमापांचें गणीत करून नियमांचा पडताळा घेतां येऊं लागला आहे. तें एक स्वतंत्र शास्त्रच बनलें आहे. महाराष्ट्रांत ध्वनिशास्त्राचा असा अभ्यास फारच थोड्यांचा आहे. डॉ. कत्रे, कृ. पां. कुलकर्णी ,प्रो. कालेलकर असे बोटावर मोजतां येण्यासारखे ध्वनिवेत्ते आहेत. दामले,

राजवाडे मोडकासारखे भाषाभ्यासी मात्र बरेच झालेत. व आजहि डॉ. कत्रे, कुळकर्णी, तुळपुळे मेहेंदळे इत्यादींचीं नांवें सांगतां येतील.

भाषा ध्वन्यात्मक असतात. वागिंद्रियांच्या साह्यानें निर्माण होणाऱ्या ध्वनीमुळें भाषेचा व्यवहार चालतो. वागिंद्रियांचें ध्वनिनिर्मिती चें कार्य वस्तुत: दुय्यम उदा. दातांचें मुख्य कार्य अन्नाचें चर्वण करण्याचें मात्र दांत ध्वनिनिर्मितीतहि भाग घेतात. भाषाशास्त्राची ध्वनिशास्त्र ही शाखा आहे. या ध्वनिशास्त्राच्या मुख्य शाखा दोन.

(१) ध्वनिविचार किंवा ध्वनिज्ञान ( PHONETICS )

(२) ध्वनिव्यवस्था ( PHONEMICS )

ध्वनिविचारांत भाषेतील ध्वनीचा शोध घेऊन ते कसे कसे उत्पन्न होतात. ( Genetic investigation ) व ते उत्पन्न झाल्यावर त्यांची कशी परिणति होते. (Genemic investigation) याचा सूक्ष्म विचार केला जातो. ध्वनिविचार शास्त्र भाषाशास्त्रज्ञास व ध्वनिव्यवस्थापकांना भाषा व ध्वनिवर्णनासाठीं साहित्य पुरवितें. ध्वनिवैज्ञानिक भाषेतील बोलांचा उद्गारांचा शरीरशास्त्रदृष्ट्या विचार करतो. कोणकोणत्या वागिंद्रियांच्या हालचालींनीं कोणकोणते ध्वनि निर्माण होतात हें सूक्ष्मनिरिक्षणाने नमूद करतो. व त्यासाठी वागिंद्रियांचें अवलोकन लॅरिंगोस्कोप स्पेक्टोग्राफ कृत्रिम टाळू इत्यादि उपकरणांची मदत घेतो. ध्वनिव्यवस्थापक ( PHONEMICIAN ) ध्वनिवैज्ञानिकानें पुरविलेल्या माहितीच्या जोरावर अगर स्वत: अभ्यासपूर्ण मिळविलेल्या माहितीच्या आधारानें ध्वनीचें पृथक्करण, वर्गीकरण व निवड करून एकीकरण करतो व ध्वनींची शास्त्रशुद्ध व्यवस्था लावतो. दोघांचेंहि कार्य परस्पर पूरक व परस्परांना उपयोगी असेंच आहे.

ध्वनिज्ञान ध्वनिसबंधी सामान्य सिद्धांत शोधीत असल्यानें ते शास्त्र आहे व शास्त्रज्ञांनी पुरविलेल्या वर्णनात्मक भागांचा आधार घेऊन रसिक ध्वनिपुनर्निर्मिती करूं शकतो. व ध्वनीच्या पुन:प्रत्ययाचा आनद मिळवूं शकतो या दृष्टीनें ध्वनिज्ञान कलाहि आहे. वर्णणात्मक, ऐतिहासिक व तुलनात्मक अशा ध्वनिविचाराच्या महत्वाच्या तीन शाखा आहेत.

उदर, छाती, फुफ्फुस, श्वासनलिका, कंठ, घसा, तालुपट, किंवा अलिजिव्हा, तोंड नाक हे वाग्यंत्राचे घटक आहेत.

फुफ्फुसांतील हवा श्वासनलिकेंतून मुखांत येते. व तेथें जिभेकडून ठिकठिकाणीं अडविली जाते. व नंतर मुखावाटे बाहेर सोडली जातें ध्वनींची निर्मिती अशा रीतीनें होतें. स्वर नलिका स्तब्ध असतांना कांहीं ध्वनि निर्माण होतात तर स्वर नलिकांच्या आंकुचन प्रसरणामुळे व कंपनामुळेंहि ध्वनिनिर्मिति होते. केव्हां केव्हां तालुपट खालीं आल्यानें, मुखांतील मार्ग बंद होतो. व नाकांतून हवा बाहेर पडते. कांहीं ध्वनींची निर्मिति या मार्गानेंहि होते श्वासोच्छ्वास होतांना हवा नाकांतून बाहेर पडतें. पण आपण बोलूं

लागतांच हवा तोंडावाटे बाहेर जाऊं लागते व मुखांतील अवयव हालचाल करूं लागतात तालुपटहि वर जातो अगर लोंबत रहातो. स्वरनलिका स्तब्ध रहातात किंवा कंप पावतात. ध्वनिसंख्येचे विविध प्रकार उच्चारणस्थानांच्या भिन्नतेवर अगर विविध उच्चारण पद्धतीवर अवलंबून असतात.

सर्वसामान्यत: भाषेंतील ध्वनीचें वर्गीकरण उच्चारणस्थानानुसार करण्यांत येतें. (१) ओष्ठाच्या साह्यानें उच्चारले जाणारे ते ओष्ठ्य ध्वनि (२) ओष्ठ्य व दंतांच्या साह्यानें उच्चारले जाणारे ते दन्त्यौष्ठ्यध्वनि (३) दांतांच्या साह्यानें उच्चारले जाणारे ते दन्त्यध्वनि (४) वर्त्स किंवा दन्तमूल आणि जिव्हा यांच्या सपर्कानं निर्माण होणारे ते वर्त्स्य* (५) कठिणतालु व जिव्हा यांच्या स्पर्शसंघर्षानें निर्माण होणारे तालव्य* (६) मूर्धा किंवा तालुशिखरांच्या ठिकाणीं जिभेच्या स्पर्शानें निर्माण होणारे ते मूर्धन्य (७) मृदुतालुस्पर्शामुळें उत्पन्न होणारे ते कंठ्य* (८) अलिजिव्हा भागांतील ध्वनी ते अलिजिव्हीयध्वनि (UVULAR) (९) स्वरनालीमुखांत निर्माण होणारे ते स्वर नालीमुखी (PHARYNGEAL) (१०) स्वरनालीविवरांत वा उरस् भागांतून निर्माण होणारे झटकी ध्वनि (GLOTTAL STOP) अगर विसर्ग महाप्राण ध्वनि असे एकूण दहा प्रकार मानले जातात.

अमेरिकन ध्वनिशास्त्र कोविदांनीं ध्वनीचें केलेले वर्गीकरण वरीलप्रमाणेंच आहे. मात्र जिभेचा जो जो भाग उच्चारणस्थानास स्पर्श करतो त्या जिव्हाभागांची नावें वर्गीकरणांत घेतली आहेत. जिव्हाग्र जिवाकट जिव्हापृष्ट जिव्हामूल अशा भागावरून नावें दिलेलीं आहेत. एकूण भाषा बोलांचे स्वर व व्यंजन हे दोन मुख्य भाग आहेत स्वर सम्राट् तर व्यंजने मांडलीक राजे होत पाणिनीनें स्वयम् राजते स्वरा । अशी स्वराची व्याख्या केलेली आहे. व परेण स्वरेण व्यज्यते इति व्यंजनम् । अशी पतंजलीने व्याख्या केलेली आहे. स्वरनलिकेंतून वा मुखांतून अविरोध श्वास बाहेर पडतांना जो सकंप ध्वनि निर्माण होतो त्यास स्वर म्हणतात. स्वर निर्माण होतांना स्वरनलिकांतील जागा आकुंचन पावत नाही व त्यामुळे अर्थातच श्रुतिगम्य असें घर्षक आवाजहि निर्माण होत नाहीं जेव्हा श्वासप्रवाह स्वरनलिकेत वा मुखांत संपूर्ण वा ओझता अडविला जातो किंवा जिभेच्या कडाकडानी श्वासप्रवाह जातो किंवा स्वरनलिका मुखाला कंपीत करतो त्यावेळेस जे ध्वनि निर्माण होतात त्याना व्यंजन असे म्हणतात व्यंजननिर्मितिच्यावेळी जशा जिव्हाग्र जिवापट जिव्हापृष्ठाच्या हालचाली होतात तशाच हालचाली स्वरनिर्मितिच्या वेळीहि होतात. तथापि श्वासप्रवाह व्यंजनाप्रमाणें कोठेच अडविला जात नाही त्यामुळें स्वराची वर दिलेली व्याख्या योग्य आहे

उच्चारण पद्धतीच्या अनुसारे व्यंजनाचें वर्गीकरण

---

* यांचे पुन: अग्र, मध्य, पश्च असे सूक्ष्म भेद मानतात.

स्पृष्ट :- हवेचा प्रवाह हा मुखांत कांहीं ठिकाणीं अडविला जातो. व ज्या मार्गानें हवा जाऊं पाहते तो मात्र कांहीं क्षण अडविला जातो. अशामुळें जे ध्वनि निर्माण होतात ते सर्व स्पृष्ट सदरांत येतात.

श्वासप्रवाह केव्हां केव्हा संपूर्णतया वाक्करणांनीं अडविला जात नाहीं. थोडीशी फट ही उच्चारणस्थानाशीं जिभेचा स्पर्श होतांना राहून जाते. अशा वेळीं जे ध्वनि निर्माण होतात त्यांना **संघर्षी ध्वनी** म्हणतात. दन्तौष्ठी फ्, व्, स्, झ्, श्, इत्यादि संघर्षी ध्वनी होत. संघर्षी ध्वनींचे स्पर्श संघर्षी ( affricates ) व सीत्कारी संघर्षी असे भेद आहेत. जेव्हां जिव्हेचा लांबोळा मधला भाग श्वासप्रवाह अडवितो व जिभेच्या कडयावरून श्वासप्रवाह जातो अशा वेळेस जे ध्वनि निर्माण होतात त्यांना पार्श्विक ध्वनि म्हणतात. ल, ल्ह अशा प्रकारचे ध्वनि होत.

जेव्हां श्वासप्रवाहामुळें जिभेचा मऊ भाग जलद जलद कंप पावतो तेव्हां जे ध्वनि निर्माण होतात. त्यांना **झंकारी** अथवा **लुंठित ध्वनि** म्हणतात. नगरी व मावळी र् अशा प्रकारचा आहे. ह्या जिव्हा कंपना ऐवजीं जिव्हाग्र फक्त वर मागे वळतें व तालु भागास स्पर्श करते तेव्हां **उत्क्षिप्त ध्वनि** निर्माण होतात.

य, व यांना अर्धस्वर मानतात. हे ध्वनि उच्चारतांना हवा संघर्ष पावत नाहीं. जीभ अगर ओठ स्पर्श पावू इच्छितात तथापि प्रत्यक्ष स्पर्शापासून अलिप्त असतात.

य, व, र, ल, यांना द्रववर्ण म्हणण्याचा प्रघात आहे.

'ह' ला महाप्राण संबोधिलें जातें. याशिवाय प, त, क इत्यादि व्यंजनांना स्फोटक म्हणतात. व्यंजन निर्मितींत (१) स्तंभन ( फुप्फुसांतील हवा पूर्ण बाहेर पडण्यापूर्वी अडविली जाणें. ) (२) धृति ( अडविलेली हवा धरून ठेवणें. ) (३) स्फोट धरून ठेवलेली हवा अडथळा दूर करून बाहेर पडणें. या तीन क्रिया अभिप्रेत आहेत. धृति जवळजवळ शून्यच असते, स्फोटक प्रमाणेंच व्यंजनांत अन्तर् स्फोटक व्यंजनें ( Implosives ) असू शकतात. आफ्रिकेंतील भाषांत कित्येतरी अशीं व्यंजनें आहेत. तालुपट खालीं येऊन श्वासप्रवाह मुखाद्वारें बाहेर न पडतां नाकाच्या द्वारें बाहेर पडतो, अशा वेळेस जे ध्वनि निर्माण होतात, त्यांना नासिक्यध्वनि म्हणतात. ङ्, ञ्, ण्, न् म् हे अनुनासिक ध्वनि होत. तसेंच सर्व स्वरांचा नासिक्य उच्चार होऊं शकतो.

याशिवाय ध्वनींचे कूजित ( Whisper ) व गुंजित ( Murmur ) असेहि प्रकार पडतात. ओष्ठ झंकारांनीहि कांही पुरकीचे ध्वनि निर्माण होतात. धुण्याच्या वेळेचा सीत्कार, भीतीच्या वेळेस निघणारे चित्कार, पाळीव प्राण्यांना बोलवितांना करण्यांत येणारे विविध चुचकार वरील उच्चारणस्थानास स्पर्श करून ओठाजवळील आंतर जबडयांतील मृदुभागावर जिभेच्या जोराच्या आघातामुळें ते निर्माण झालेले टणत्कार,

पशुपक्षांच्या बोल नकलतांना होणारे कलरव असे कितीतरी ध्वनि लिपीनिविष्ट नसतां-नाहि भाषेंत अस्तित्वांत आहेत. या सर्वामुळें आपण मनांतील भावनाविचार संभाषिकास यथार्थपणें कळवितों. भाषेची केवढी मोठी देणगी मानवास लाभलेली आहे. इतर मूकप्राण्यापेक्षां मानवी प्राणी भाग्यवान म्हणतात त्याचें कारण त्याची हीच वाचाशक्ति होय. ओष्ठ्य, दन्त्य, तालव्य वर्ण नासिक्य वर्ण सानिध्यानें ओष्ठ्येतर, तालव्येतर नासिक्येतर वर्णांचेंहि थोडयाफार प्रमाणांत ओष्ठीकरण, तालव्यीकरण, अनुनासिकीकरण होतें. अशा प्रकारचे ध्वनि मूळांतील ध्वनिपेक्षां किंचित वेगळे भासतात. अशा प्रकारचे ध्वनि विचारांत घेतल्यास ध्वनिसंख्येंत कितीतरी भर पडलेली आहे. अग्र आणि पश्च स्वर हे नेहमींच्या प्रथेपेक्षां अगदीं उलटसुलट ( अग्रस्वर ओठांचा चंबू करून व पश्च स्वर ओठ पसरून ) उच्चारतां येतात. वात्सल्य, आश्चर्य, खेद इत्यादि भावनाभिव्यक्तीसाठीं आपण यांचाहि क्वचित आश्रय घेतो.

भाषेंत ज्याप्रमाणें ध्वनि आहेत त्याप्रमाणेंच नाद, सूर ( PITCH ) व स्वरांचे आरोह अवरोहहि ( INTONATION ) आहेत. चिनी, जपानी व आफ्रिकेंतील मेक्सिकोंतील कांहीं भाषा स्वरांच्या आरोह अवरोहावर अवलंबून आहेत. जरा आरोह अवरोहांत गफलत झाली कीं भिन्नार्थनिष्पत्ति झालीच म्हणून समजा. सुरामुळें उच्चारण-स्थान न बदलतां अगर सूर न चढवितां स्वर हवा तेवढा लांबवितां अगर आखूड करतां येतो. शेतकऱ्यांचीं मोटेचीं गाणीं अशा सुराचीं उदाहरणें आहेत. घरांतील पांडवप्रताप भक्तिविजयाचीं पारायणेंहि सुरांतच चालतात. स्वरांचे आघात हे इंग्रजीमारख्या कांहीं आर्यभाषांचे प्राण आहेत. आपल्याकडेहि नगर जिल्ह्यांतील हिंदी ख्रिश्चन लोकांच्या मराठींत परकीय मिशनऱ्यांच्या सहवासानें असे आघात आढळतात. एकच बैल शब्द ग्रामीण मराठींत बइल, बईल? बइलऽ ( अनेकवचन ) असे निरनिराळ्या आवाजांत म्हटला गेल्यास भिन्नार्थ व भिन्न भाव व्यक्त होतो ही गोष्ट सर्व श्रुत आहे. भाषा भावनाभिव्यक्तीसाठीं बोलण्यांत, लिखाणांत, काव्यांत यांची मदत घेण्यास मागें पुढें पहात नाहीं. मदत किती घ्यावयाची हें भाषेच्या मूळ प्रकृतीवर अवलंबून असते इतकेंच. ध्वनिसमुच्चय उच्चारीत असतांना थांबावयाचें कोठें या संबधीचे यतिविषयक संकेतहि पाळावे लागतात. यतिविषयक संकेत न पाळल्यास 'काकाजी अजमेर गये' चा काकाजी अज मर गये किंवा 'तूं जाऊ नये' चा तूं जाऊन ये असे अर्थाचे अनर्थ होण्याचा संभव असतो. अनर्थ टाळण्यासाठीं यतीचाहि अभ्यास भाषाभ्यासकास अवश्य आहे. ग्रामीण भाषेच्या अभ्यासकास ग्रांथिकभाषेच्या लकबा तर समजावून घ्याव्या लागतातच पण वेळोवेळीं ज्या परभाषांनीं आक्रमण केलें असेल त्यांच्याहि ध्वनीच्या व अन्य लकबा व त्यांचे स्वभाषेंतील ध्वनीवर झालेले परिणामहि समजावून घ्यावे लागतात. यामुळेंच ग्रामीण भाषांतील ध्वनि परिवर्तनांचा यथार्थ इतिहास कळूं शकेल.

## २. ध्वनींद्रियांची रचना—

भाषेंतील व्याकरणाचा विचार त्यांतील ध्वनींचा विचार केल्याशिवाय पूर्ण होत नाहीं. ध्वनिनिर्मिति करणाऱ्या इंद्रियांना स्वरेंद्रियें किंवा ध्वनींद्रियें अशी संज्ञा आहे. लौकिकांत जिभेची टकळी, जीभ सैल सोडणें, जिभेचा पट्टा, जीभ विटाळणें, जबान देणें, जबानी इत्यादि वाक्प्रचारावरून जीभ हेंच मुख्य ध्वनींद्रिय मानलें जातें. तथापि एका हातानें टाळी जशी वाजत नाहीं, तशी एकटी जीभहि ध्वनिनिर्मिति करण्यास असमर्थ असते. जिभेखेरीज फुफ्फुसें श्वासनलिका, स्वरयंत्र, स्वरनालीमुख, नाक, पडजीभ, मुखांतील टाळू, दांत, ओठ हीं देखील ध्वनींद्रियेंच आहेत. इतकेंच काय आपल्याकडील ध्वनि-वेत्त्यानीं ध्वनिनिर्मितीस उदर आणि नाभी यांचें देखील साह्य होतें असें सांगितलें आहे. या इंद्रियांना ध्वनिनिर्मितीखेरीज इतरहि दुसरीं कामें करावी लागतात. दातांना अन्नाचें चवर्ण करावें लागतें, नाकामुळें श्वास घेतां येतो व सुगंध कळतो, जीभेमुळें अन्नाची चव कळते.

सर्वसाधारणपणें आवाज ( NOISE ), सूर किंवा तान ( TONE ) यांचाहि अंतर्भाव ध्वनींत करतात. पानांची सळसळ, पक्ष्याच्या पंखांची फडफड, विजेचा कडकडाट, दरवाजाची उघडझाप करीत असतांना होणारी कुर्कुर, बुटांची करकर यांना आपण आवाज म्हणतों. आवाजाचेहि भेद पाडतां येतील. आवाजांत मार्दव असल्यास त्यांना आपण रव म्हणतो. त्यात सुसंबद्धता, ताल, सुरेलपणा निदर्शनास आल्यास स्वन म्हणतो; व त्यांत संक्षुब्धता आढळल्यास त्याला गोंगाट, किलबिलाट म्हणतो. आवाज सांघिक असून सुरेल असल्यास त्यास स्वनैक्य किंवा समस्वन ( harmonious MELODY ) म्हणतो. स्वरचिमटे, बांसरी, पावा, पाई, किन्नरी, दिलरुबा, पेटी वाजविल्यानें अगर गायनातील आलाप यांनाहि सर्वसाधारणपणें ध्वनीच म्हणतात. तथापि मानवानें वा प्राण्यानें उच्चार करून काढलेल्या ध्वनीना बोल ( speech sound ) अशी संज्ञा आहे. व मानवाचे जे आवाज साकारित होतात व सजातीय विशिष्ट समूहाला तरी कळण्या-सारखे असतात मग ते सार्थ असो वा अर्थरहित असो त्यांना 'ध्वनि' ही संज्ञा शास्त्रीय परिभाषेत देणें इष्ट आहे. लिपिनिविष्ट ध्वनीना वर्ण अशी संज्ञा आहे. सार्थ ध्वनिसमूहास शब्द म्हणतात. एका श्वासात उच्चारलेल्या ध्वनीला अगर ध्वनिसमूहास अक्षर म्हणतात.

एकादा ध्वनि ऐकताक्षणीच आपणास त्याच्या शक्तीची अगर आवाजाच्या लहानमोठेपणाची, (२) आवाजांतील उंचीची अगर तानेची, (३) विशिष्ट ध्वनि साकारित करणाऱ्या पात्रतेची ( Quality ) अर्थात ध्वन्याकार क्षमतेची प्रतीति होऊं शकते. आवाजाचा लहानमोठेपणा हा कंपित हवेच्या बाहेर जाणाऱ्या प्रवाही झोताच्या कमीजास्तपणावर अवलंबून असते. सुराची उंची हवेचा झोत बाहेर जाण्यासाठीं लागणाऱ्या कमीजास्त वेळेवर अवलंबून असते.

ध्वनींचा शरीरशास्त्रदृष्टया विचार करतांना भाषा सजीव असते. भाषेला अर्थ असतो इत्यादि गोष्टी बाजूला ठेवाव्या लागतात व भाषा ही निव्वळ प्रेतवत समजून तिच्यांतील ध्वनिनिर्मिति ध्वनिकार्य समजावून घेण्यासाठी भाषेची चिरफाड करावी लागते. प्रस्तुत प्रकरणांत ध्वनींचा शारीरिक विचार केलेला आहे.

श्वासोच्छ्वास करतांना फुप्फुसांतील हवा श्वासनलिकेच्या मार्गानें नाकावाटें ये जा करीत असते. ध्वनिनिर्मिति होत असतांना ही हवा तोंडावाटें बाहेर पडणें आवश्यक असते. जिभेकडून अगर ओठांकडून ही हवा अडविली गेल्यामुळें कांहीं ध्वनि निर्माण होतात. ज्या ज्या ठिकाणीं जीभ हवा अडविते त्या ठिकाणांना स्पर्शस्थान अगर उच्चारण-स्थान म्हणतात. नासिक्य ध्वनींच्या बाबतींत मात्र नाकाची मदत होते. श्वास आंत आंत घेतांनाहि ध्वनि निर्माण होतात. स्वरनालींतून श्वास मुखावाटे बाहेर पडतांना तो स्वरनालीमुखांत ( Pharynx ) अगर जिभेकडून अडविला गेला नाहीं तरीहि कांहीं ध्वनि निर्माण होतात. अशा ध्वनींचे प्राण किंवा विसर्ग किंवा स्वर असे प्रकार आहेत.

नेहमींच्या श्वासोच्छ्वासांत **पडजीभ** लोंबलेली असते व हवेची तोंडाकडे येण्याची वाट बंद असते. ही पडजीभ जशी मुखाकडे हवा येण्याची वाट बंद करूं शकते तशीच नाकाकडे जाणारी हवाहि पूर्णपणें अगर अर्धवट बंद करूं शकते; व त्यामुळेंच बहुतेक ध्वनि निर्माण होतात. नाक, दांत, टाळू इत्यादि ध्वनींद्रियांना अचल ध्वनींद्रियें म्हणतात. ओठ, जीभ, पडजीभ यांना चलनवलन करणारीं अर्थात चल ध्वनींद्रियें म्हणतात. नाक व ओठांना मुख बाह्य, जीभ, दांत, टाळू, पडजीभ यांना मुखांतर्गत व स्वरनालीमुख, गलद्वार स्वरयंत्र, स्वरनलिका, स्वरनाली विवर, श्वासनलिका, फुप्फुसें यांना आंतर ध्वनींद्रियें म्हणतात.

**ओठ:**– ओठांचा एकमेकास स्पर्श झाल्यावर प, फ, ब सारखे ओष्ठ्य ध्वनि निर्माण होतात. भारतीय आर्यभाषेंत द्वोष्ठ्य ध्वनी आहेत. इंग्लिश भाषेंत दंतौष्ठ्य ध्वनी आहेत. वरच्या दातांचा ओठाशीं स्पर्श झाल्यानें अशा प्रकारचे ध्वनी निर्माण होतात. ओठांचें प्रसरण, प्रकुंचन ( Protruding ) व पुरक्या यामुळें विविध प्रकारचे ओष्ठ्य ध्वनी निर्माण होतात. खालच्या ओठांना दांतांचा स्पर्श होत असतांना केव्हां फटींतून हवा जोरानें निसटत असते अशा वेळेस फ्. व्ह्. सारखे दन्त्यौष्ठ घर्षक ध्वनी निर्माण होतात. सर्वसाधारणपणें वरचा दांत खालील ओठांना लागून दन्त्यौष्ठ्य ध्वनी निर्माण होतात. तथापि खालचे दांताचा वरच्या ओठाला स्पर्श करून दन्त्यौष्ठ्यध्वनी निर्माण होऊं शकतात. तथापि असे ध्वनि भाषेंत आढळांत नाहीं

**दांत:**– जिभेचा स्पर्श दांताच्या निरनिराळ्या भागास होऊन दन्त्य व दन्त्य-तालव्य ध्वनी निर्माण होतात. दन्त्यमूल, दन्त्यमध्य, व अधोदंत अशा ठिकाणीं जिभेचा स्पर्श झाल्यानें विविध प्रकारचे दन्त्यध्वनी निर्माण होतात. अधोदंताच्या खालील टोकांनीं अर्थात् दन्ताग्रांनीं जीभेला स्पर्श केल्यानेंहि दन्त्यध्वनी निर्माण होऊं शकतात. सर्वसाधारण-पणें भाषेंत हे ध्वनी नाहींत.

**टाळू:**– टाळूचे कठीणतालु, तालुशिखर व मृदुतालु असे तीन भाग असून त्यांचेहि पूर्व, मध्य, अंत असे पोटभाग पडू शकतात. जिभेच्या निरनिराळ्या भागांचा स्पर्श या भागांना होऊन वर्त्स्य किंवा तालव्य, मूर्धन्य, कण्ठ्य ( वस्तुतः मृदु तालव्यच ) अंततालव्य ( अरबी क़, ख़, ग़ ) ध्वनींची निर्मिति होते.

**जीभ:**– सर्व ध्वनींद्रियांत जीभ महत्वाचें इंद्रिय आहे. जिभेचें जिव्हाग्र, जिव्हापट किंवा जिव्हापृष्ठ, पार्श्वजिव्हा, असे भाग पडतात. केव्हां केव्हां जिव्हाकटहि ध्वनि निर्मितींत भाग घेतो. इंग्लिश ध्वनीवेत्त्यांनीं ध्वनीचें वर्गीकरण जिभेच्या अशा भागावरूनच केलेलें आहे.

**आंतर ध्वनींद्रियें:—**

यांत स्वरनालीमुख ( Pharynx ) गलद्वार ( Epiglottis ) स्वरनालीविवर ( Glottal region ) स्वरयंत्र ( Larynx ) खऱ्या अगर सुक्षम–स्वरनलिका खोट्या अगर अधम स्वरनलिका, श्वासनलिका, श्वासवाहिन्या फुप्फुसें यांचा अंतर्भाव होतो.

सतार किंवा दिलरुबा वाजवितांना जशा तारा छेडल्या जातात व तारांच्या कंपनाबरोबरच हवा कंप पावून जसे मंजुस्वन निर्माण होतात तसेंच बोलतांना स्वर-नलिकांची हालचाल होऊन ध्वनी निर्माण होतात. मानवानें शोध लावलेल्या कोणत्याहि वाद्यापेक्षां स्वरयंत्र हें सर्वांशानें पूर्ण असें वाद्य आहे. स्वरयंत्र हा जणूं काय पावाच ( Wind instrument ) स्वरनलिका कंप पावतात तेव्हां त्या हवेला निरनिराळ्या रीतीनें ध्वनिमय अगर नादमय करूं शकतात. खजिरीवर थाप पडली कीं, सभोंवतालच्या किंकिण्याहि आपोआपच वाजतात किंवा पाईंत मुख्य छिद्राबरोबरच इतर छिद्रांच्या ठिकाणीं बोटांची हालचाल करून हवा कमीजास्त अडवून विविध मंजुस्वन निर्मिति होऊं शकते तसेंच श्वास ध्वनिमय व्हावा यासाठीं साथ देण्याचें कार्य मुखांतील इतर अवयव करतात.

**छाती:**– ( Thorax ) भात्याप्रमाणें फुप्फुसांचें आंकुंचन प्रसरण करण्याचें कार्य करते श्वासनलिका ( Trachea ) ही एक लवचिक नलिका असूनफुप्फुसांत तिच्या सूक्ष्म होत गेलेल्या अनंत शाखा आहेत. त्यांना श्वासवाहिन्या म्हणतात. मुख्य श्वास-नलिकेच्या वरच्या टोकासच स्वरयंत्र असते.

स्वरयंत्र हें पांच कूर्चांचें बनलेलें आहे. कंठग्रंथि व दोन स्वरनलिकाबंधन ही महत्वाचीं हाडें आहेत. स्वरनलिकाबंधनें लवचिक असतात. स्वरयंत्रांत खऱ्या अशा दोन स्वरनलिका असतात व तितक्याच खोट्या स्वरनलिका असतात. त्याचप्रमाणें पडघम मधोमध फाटल्यानें मोठी चीर दिसते. त्याप्रमाणें स्वरनाली किंवा स्वरयंत्र विवर (Glottis) असते. याचेहि दोन भाग असतात. ( १ ) बाह्य स्वरनाली व ( २ ) स्वरयंत्राच्या आंतील स्वरनाली; ही स्वरनाली स्थितिस्थापक व लवचिक मांसल तंतूनीं वेष्टिलेली असते. ही

वेष्टनें स्वरयंत्राचा आकार थोडा बदलूं शकतात. यांनाच स्वरनलिका म्हणतात. पुरुषाची स्वरनलिका स्तब्ध असतांना १८$\frac{२}{३}$ मिलिमीटर असते व कंपित अगर प्रसृत झाल्यावर २३$\frac{१}{६}$ मिलिमीटर होते. स्त्रियांच्या स्वरनलिका स्तब्ध असतांना १२$\frac{२}{३}$ मिलिमीटर व कंपित अगर प्रसृत झाल्यावर १५$\frac{२}{३}$ मिलिमीटर लांब असते. स्त्रियांचा गळा कोमल कां असतो हें वरील पुरुषांच्या व स्त्रियांच्या स्वरनलिकांच्या लांबींतील तफावतीवरून दिसून येईल.

स्वरयंत्राच्या वरच गलद्वार ( Epiglottis ) असतें. हें एक पर्णाकृति लवचिक स्नायुमय हाड असतें. आपोआप उघडझाप करणाऱ्या झडपाप्रमाणें गलद्वाराचें कार्य असतें. स्वरनाली अर्थात गळयाचा ( glottis ) मार्ग खुला अगर बंद करण्याचें काम या गलद्वाराचेंच असतें. व जिभेच्या बाजूकडे त्याचा अंतर्गोलमय रुंद भाग असतो व स्वरयंत्राकडील भाग बहिर्गोलाकृति असतो. अन्न खातांना घोडयावरील उपलणाप्रमाणें गलद्वाराची झडप स्वरयंत्र मार्गावर पडलेली असते. अन्नकण या श्वासमार्गात गलद्वाराच्या गफलतीनें आल्यास ठसका लागतो. बोलतांना अन्नकण अशा रीतीनें श्वासमार्गात येण्याचा संभव असतो.

निरनिराळया वाद्यांतून निरनिराळे रवन ( Timbre ) जसे निघतात. तसेंच बोलतांना निरनिराळया प्रकारचे ध्वनी निर्माण होतात. व हें कार्य स्वरनलिका, जीभ वगैरे ध्वनींद्रियें करतात.

---

### ३ अहिराणी व तिच्या उपभाषा :—

अहिराणी वर्णप्रक्रियेचा व रूपप्रक्रियेचा विचार करण्यापूर्वी अहिराणीच्या विस्ताराची व तिच्या उपभाषांच्या अस्तित्वाची व व्याप्तीची कल्पना देणें इष्ट आहे. अहिराणी कोठें कोठें बोलली जाते याविषयींची सविस्तर माहिती 'अहिराणीची कुळकथा' या पुस्तकात प्रकरण दोनमध्यें सविस्तरपणें दिलेली आहे. डॉ. ग्रियर्सननें ही भाषा बोलणारांची संख्या १२ लाख नमूद केलेली होती. उलट नुकत्याच झालेल्या शिरगणतींत ही संख्या कमालीची घटलेली आहे असें नमूद केलें आहे. शिरगणतीच्या या आंकडयावरून ही भाषा अजिबात नामशेष होण्याच्या पंथास लागली असें मात्र समजूं नये. खानदेश हा द्विभाषिक प्रांत असल्यानें अहिराणीस मराठीपासून वेगळें मानीत नाहीं. खुद्द खेडुत देखील अहिराणीसच मराठी म्हणतात. महाराष्ट्रांतील आपण मराठे आहोंत हा त्यांचा अभिमान जागृत आहे व त्या दृष्टीनें आपली मातृभाषा अहिराणी असूनहि अहिराणीऐवजीं अहिराणी मराठीचाच एक भाग म्हणून मराठीच नोंदली आहे. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ महागुजरातच्या आक्रमणाची भीति यामुळेंहि अहिराणीचें निराळें अस्तित्व

भासवूं नये असे शिरगणती करणाऱ्या सुशिक्षित शिक्षक व इतर शिरगणतीच्या अधिकाऱ्यांना वाटलें असावें. मराठीचें ग्रांथिक भाषा व सरकारदरबारांतील प्रांतभाषा या दृष्टीनें अहिराणी भाषा बोलणाऱ्या भागांत वर्चस्व तर आहेच पण त्याशिवाय धार्मिक, सांस्कृतिक क्षेत्रांतहि मराठी ही खानदेश, नाशिकभागांत अग्रपूजा घेते. अहिराणी ही मातृभाषा न नोंदविण्याच्या बुडाशीं नाशिक, खानदेशांतील शिक्षणाचा अतीव प्रसार व लोकांची व पुढाऱ्यांची अहिराणीविषयीं अनास्था आहे. सुशिक्षित व सुशिक्षितांच्या सहवासांत वारंवार येणारे खेडूत व मातृभाषा अहिराणी बोलत असतांना या सुशिक्षिताकडून उपहासिले जाणारे खेडूत यांना मातृभाषा अहिराणी सांगणें कमीपणाचें वाटतें. अहिराणीची मराठीची पोटभाषा म्हणून कां होईना पण शिरगणतींत व्यवस्थित नोंद होणें जरूर होते. आजहि खानदेश, नाशिक भागांतील खेडीच्याखेडींच नव्हे तर कळवण, सटाणे, नामपूर, धुळे मालेगांव, शिरपूर, शिदखेडे, अमळनेर, चोपडे, पाचोरे, चाळिसगांव इत्यादि मोठ्या गांवांतहि घराप्रमाणेंच बाहेरहि सर्रास अहिराणीचाच वापर आहे.

अहिराणीची वर्णप्रक्रिया, रूपप्रक्रिया यांचा विचार करतांना तिच्या उपभाषांचाहि विचार करणें क्रमप्राप्त आहे. मध्यवर्ति अहिराणीच्या ध्वनिरूपांशीं या उपभाषांची समानता, विभिन्नता कोठे कोठे आहे, हें दाखविणेंहि जरूर आहे.

डॉ. ग्रियर्सननें अहिराणीचे उतारे ज्या ठिकाणाहून जमविले त्या ठिकाणच्या भाषेस अहिराणीची उपभाषा संबोधिलेलें आहे व त्या त्या ठिकाणचें नांव या उपभाषांना दिलेलें आहे. ( उदा. शिंदखेडी, पाचोरी, इत्यादि ) अर्थात डॉ. ग्रियर्सननें केलेलें वर्गीकरण हें तोकडें आहे. व वस्तुस्थितीलाहि फारसें धरून नाहीं. अहिराणीच्या उपभाषांचे दोन प्रकारें वर्गीकरण करतां येतें. (१) प्रादेशिक उपभाषा (२) ज्ञातीय उपभाषा. अहिराणीच्या उपभाषा खालील प्रमाणें आहेत.

**(१) मध्यवर्ति अहिराणी :**--(अहि.) धुळे, अमळनेर परिसरांतील अहिराणी ही मध्यवर्ति अहिराणी होय अहिराणीची घटना ही या बोलीवर आधारलेली आहे. अहिराणी हे अहिराण ( आभीरदेश ) यावरून पडलेलें नाव आहे. अर्थातच तें प्रादेशिक नांव आहे. अहिरांचें राज्य असलेल्यां प्रदेशास अहिराण किंवा अहिराणपट्टी आजहि खानदेशांत म्हणतात. मुळांत हें नांव आभीर किंवा अहीर या जातीवरून जरी आलेलें असलें तरी तें आज जातीवाचक नांव नाहीं. खानदेशांत अहीर जमाती थोड्या आहेत.

अहिराणी ही या जमातीचीच नव्हे तर इतरहि अहीर वंशीय नसलेल्या वर्गाचीहि भाषा आहे. शिवाय अहीर हीं नांवें ज्या जमाती लावतात ते सर्वच "अहीर" वंशीय असतील किं नाहीं याबद्दल शंका डॉ. इरावतीबाई कर्वेसारख्या समाजशास्त्रज्ञांनीं प्रकट केलेली आहे. गुर्जर देशांतील गुजर, लाट देशांतील लाड, रेवा कांठचे रेवा, बिहारांतील

बिहारी तसेंच आभीर किंवा अहीर देशांतील ते अहीर असेंहि या अहीर सोनार, शिंपी, गुरव, कासार, साळी या जमातीबाबत असण्याचा संभव आहे. मूळ गुर्जरावरून जरी गुजरात नांव पडलें तरी आज गुजरातेंतील सर्वच जनता कांहीं गुर्जर वंशीय नाहीं. भिन्न-भिन्नवंशीय लोक तेथेंहि आहेत. व मूळ गुर्जर कालौघांत इतर वंशीयाशीं एकरूप झालेले आहेत. तोच प्रकार खानदेशांतील अहिरांचा झालेला असावा. शिवाय आभीर देश याचा उल्लेख इतिहासांत आढळतो. त्यामुळें अहिराणी हे जातिवाचक नांवाऐवजीं देशवाचक नांवावरूनच पडण्याचा संभव अधिक. बागलाणांतील बागलाणी या तिच्या उपभाषेच्या नांवावरूनहि या विधानास पुष्टि मिळते. ही भाषा धुळे, अमळनेर, शिंदखेडे, शिरपूर, साक्री, पिंपळनेर, चाळिसगांव, पाचोरे, जळगांव, चोपडे, यावल व मराठवाड्याचा चाळिसगांव, पाचोरे तालुक्यास लागून असलेल्या भागांत बोलली जाते. या भाषेंत वाङ्मयनिर्मिति फारशी नाहीं. मात्र अलिखित असें लोकवाङ्मय भरपूर आहे. प्रस्तुत लेखकानें या भाषेंतील उत्तमोत्तम अशा लोकवाङ्मयाचें दर्शन गिरजा, तापीतरंग, खानदेशवाग्वैभव यांच्या द्वारां घडविलें आहे. याशिवाय खानदेशांत ठिकठिकाणीं या भाषेंत लिहिलेलीं कानबाई देवतेच्या स्तुतीपर अशीं अनेक गाणीं आहेत. त्यांचें संकलन झाल्यास महानुभावांच्या वाङ्मयाप्रमाणेंच मराठींत बहुमोलाची भर पडेल. याशिवाय शार्दूल, बोरसे कवींनींहि या भाषेंत काव्यें लिहिलेलीं आहेत. कलापथकासाठींहि कांहीं लेखकांनीं संवाद लिहिलेले आहेत.

२. **बागलाणी** ( बाग. ) ही देखील अहिराणीची प्रादेशिक उपभाषा आहे. नाशिक जिल्ह्यांतील कळवण, बागलाण, मालेगांव, नांदगांव, चांदवड व सुरगाणे यांत ही भाषा बोलतात. डॉ. ग्रियर्सननें या भाषेचा उल्लेख निहारी असा केलेला आहे. एकेकाळीं बागलाणांतील बागुल राजांचा आश्रय या भाषेस होता. त्यांच्या बागलाण या प्रदेशावरूनच भाषेस बागलाणी म्हणतात. खुद्द बागलाण भागांतील लोक मात्र आपल्या भाषेस अहिराणीच म्हणतात. बागलाणांत ठाकूर किंवा ब्रह्मभाट आहेत. त्यांनीं या भाषेंत कित्येक कवनें केलेलीं आहेत. आजहि मराठा समाजाच्या लग्नप्रसंगीं हे भाट बागलाणींत कवनें म्हणतात. हे लोक शीघ्र कवि असतात. शहाजी राजाच्या दरबारांत मोरीरच्या भाटानें बागलाणी भाषेंत काव्य शहाजी राजास ऐकविलें; त्याचा उल्लेख जयरामपिंड्याकृत राधामाधवविलास चंपूत आलेला आहे. जुन्या अहिराणीचा नमुना म्हणून मोरीरच्या भाटाचें हें काव्य विशेष महत्त्वाचें आहे. आजहि या भाटांचीं काव्यें अनेक आहेत. राजस्थानीप्रमाणेंच या भाटाच्या बागलाणी काव्यांत शृंगार, वीर, वात्सल्य भक्तीरसपर अनेक लोकगीतें आहेत; व परंपरेनें ऐकलेल्या लोककथाहि ते सांगतात. त्यांचीं कांहीं काव्यें म्हणजे लांबलचक गद्यासारख्या ओळी. म्हणण्याची धाटी मात्र काव्याप्रमाणेंच असते. हीं सर्व काव्यें हस्तगत होऊन प्रसिद्धिल्यास मराठींत बहुमोल भर पडेल.

३. **नंदुरबारी** ( नंदु. ) गुजरातशीं निकटचा संबंध असणारी भाषा. शहादे, तळोदे, दोंडायचे, नंदुरबार, नवापूर भागात ही बोलली जाते. गुजरातीच्याहि लकबा

हिच्यांत आहे. नवापूर, तळोदे येथील मावची भिल्ली भाषेहून भिन्न व मध्यवर्ति अहि-राणीशीं अनेक बाबींत जुळती आहे.

**४ डांगी :--** ( डां. ) पिंपळनेर पासून डांगी मुलखास सुरवात होते. कळवण बागलाणच्या व साल्हेर मुल्हेर पलिकडील भागासहि 'डांग' मुलुख संबोधलें जाते. या प्रदेशांत सागाचीं झाडें भरपूर व पाऊसहि भरपूर पडतो. डांग म्हणजे फांदी ( Potruded region ) म्हणजेच खानदेशचाच प्रस्तृत भाग. व डांग याचा दुसरा अर्थ वृक्षसमुदाय, डांगचा तिसरा अर्थ वेळू कळकांचा समुदाय. लोकवाङ्मयांत डांग व खानदेश यांचा घनिष्ठ संबंध उल्लेखिलेला आहे. महाराष्ट्राशीं याचा पूर्वीपासून व्यापार होता. गायकवाडींत समाविष्ठ असलेला हा मुलुख. पण डांगी लोकांचे आप्त सोयरे खानदेश नाशिक भागांत भरपूर. डॉ. ग्रियर्सननें डांगीला अहिराणीची उपभाषा संबोधिलेलें आहे. डांगीचें आजचें स्वरूप पाहतां व अहिराणीशीं तुलना करतां डॉ. ग्रियर्सनचें हें विधान सर्वस्वी बरोबर आहे. गुजरातीशीं मावचींच्या भाषा फार तर जुळत्या होतील. डांगी मुळींच नाहीं. तसें पाहिल्यास मावची भिल्ली ही जशी मराठीहून भिन्न आहे तशीच गुजरातीहूनहि भिन्न आहे.

**५ नेमाडी** ( ने. ) नेमाड प्रांतांत बोलली जाणारी भाषा. ही भाषा बोलणारांची संख्या पुष्कळ होती. आतां राजस्थानीच्या प्रभावानें ही भाषा बोलणारांची संख्या कमी होत चालली आहे. खानदेशांतील चारण, वंजारी ही भाषा बोलतात. त्यांच्या गांवास तांडे म्हणतात. खानदेशांत 'तांडे' उपाधि असलेलीं अशीं अनेक खेडीं आहेत. उदा. वडगांवतांडे.

खालील भाषा विशिष्ट जमातीच्या आहेत. या विशिष्ट ज्ञातीवरून त्या भाषांना नांवें दिलीं गेलींत.

**६ लाडशिक्की :--** ( ला. ) लाड व लाडशिक्के ह्या नाशिक, खानदेशांत सुखवस्तु वैश्य जमाती आहेत. महाराष्ट्रांत कित्येक शतकापूर्वी ह्या जमाती लाट देशांतून येऊन स्थायिक झालेल्या आहेत. भाषा अहिराणीच. तथापि नीटनेटकी, वरच्या दर्जाची सुडौल ( Well polished ) अशी आहे. संस्कृतांतील शब्द जसे तसें वापरण्याचा हव्यास लाड-शिक्के जमातींना फार. काहीं विशिष्ट लकबामुळें त्यांच्या भाषेस लाडशिक्की सबोधतात.

**७ पावरी भिल्ली :--** ( पा. भि. ) सातपुड्यांत राहणाऱ्या भिल्लांच्या अनेक जमाती आहेत. चोपडे, यावल भागांत राहणाऱ्या भिल्लांना पावरी म्हणतात. ठाण्यांतील वारली, कोळी, दुबळे या लोकांशीं यांची तुलना करतां येईल. मात्र वारल्यापेक्षां ही जात काटक व साहसी. भिल्ल जमात स्वभावतः युद्धप्रीय, पण स्वभाव दिलदार. प्राण गेला तरी दिलेला शब्द फिरवीत नाहीं. भिल्लांचा हा स्वभाव लक्षांत घेऊनच औट्रम साहेबांनीं यांच्या पलटणी बनविल्या. त्यांची भाषा मध्यवर्ति अहिराणीशीं बहुतांशीं जुळती भाषा असली तर कांहीं विशिष्ट भिन्नत्वाच्या छटाहि आहेत. अमरावतीचे शिवाजी लोक-

विद्यापीठांतील प्राध्यापक डॉ. श्री. श्रीराम अत्तरदे यांनीं 'सावलीच्या उन्हांत' ही कादंबरी लिहिली आहे. या कादंबरींत पावरी भिल्लीचे अनेक उतारे आहेत.

८. भिल्ली :- (भि.) खानदेश नाशिक भागात सपाटीवर राहणाऱ्या भिल्लांची भाषा. लिखित वाङ्मय मुळीच नाही तथापि पाईवर म्हटलीं जाणारीं अनेक हृदयंगम नृत्यगीतें व तालगीतें आहेत.

९. भावसारी :- ( भाव. ) भावसार समाजाचीं भाषा. पूर्वीं त्यांच्या धंद्या-वरून त्यांना रंगारी म्हणत असत. व त्यांच्या भाषेस रंगारी म्हणत गुजरातच नव्हे तर वऱ्हाड ते खालीं धारवाडपर्यंत ही जमात विखुरलेली आहे. महाराष्ट्रांतहि, खानदेशांत ही जमात अहिराणीचा वापर करते. मात्र त्यांची अहिराणी मध्यवर्ति अहिराणीहून थोडी निराळी आहे. डॉ. ग्रियर्सननें रंगारी भाषेंतील दोन उतारे दिलेले आहेत. लिखित वाङ्मय कांहीं नाहीं. जमात सुशिक्षित असल्यानें गुजरातेंतील भावसारांनीं गुजरातीचा अंगीकार केलेला आहे तर महाराष्ट्रांतील भावसारांचा कल मराठीचा सर्रास वापर करण्याकडे दिसून येतो.

१०. लेवा पाटीदारी :- ( लै. पा. ) उर्फ वऱ्हाडी अहिराणी. ( व. अहि. ) मध्यवर्ति अहिराणीच्या व वऱ्हाडीच्या बऱ्याचशा लकबा या भाषेंत आढळतात. यावल, रावेर, भुसावळ, एदलाबाद भागांत लेवेपाटीदार या रेवाकाठच्या प्रदेशामधून महाराष्ट्रांत बाराव्या शतकापूर्वी स्थायिक झालेल्या लोकांची भरपूर वस्ती आहे. त्यांच्या नांवावरून या भाषेस लेवापाटीदारी भाषा असें नांव पडलें आहे. तथापि वरील भागांतील इतर जमातीहि त्यांच्यासारखीच भाषा बोलतात. हा सर्व मुलुख वऱ्हाडच्या लगतच नव्हे तर वऱ्हाडचाच भाग आहे. त्यामुळें या भाषेस वऱ्हाडी– अहिराणी म्हणणेंच अधिक सयुक्तिक आहे. महाराष्ट्रांतील सुविख्यात कवि श्री. सोपानदेव चौधरी यांच्या मातोश्रींनीं– बहिणा-बाईंनीं याच भाषेंत कविता केल्या, त्यांचा संग्रह नुकताच प्रसिद्ध झालेला असून तो लोकादरासहि पात्र झालेला आहे.

११ गुजराऊ :- पूर्व व पश्चिम खानदेशांत गुजर, दोडे गुजर, रेवागुजर वैगेरे जमातींची बरीच वस्ती आहे. तळोदे, शहादे तालुक्यात ही संपन्न अशी जमात आहे. तिच्यात मध्यवर्ति अहिराणीचीं वैशिष्टचें बऱ्याचशा प्रमाणांत आढळतात. कांहीं बाबतींत मात्र ती गुजरातीचें अनुकरण करते. अहिराणी भाषिकांच्या टापूत बेटाप्रमाणें या लोकांचीच भरलेली अनेक खेडीं आहेत. त्यामुळें गुजराऊवर अहिराणीचा प्रभाव अधिक असणें स्वाभाविक आहे.

१२ तडवी :- ( तड. ) खानदेशात मुसलमानी अमलांत सक्तीनें बाटून मुसलमान झालेल्या भिल्लांना तडवी म्हणतात. तापीतटाकीं यांची वस्ती बरीच आहे. मुसलमानांच्या संपर्कानें थोड्या उर्दूच्या लकबा व शब्द हिच्यांत शिरलेले आहेत. मुसलमानी धार्मिक

रीतिरिवाज दर्शक शब्दांना विशिष्ट प्रतिशब्द या भाषेंत आहेत. धार्मिक संस्काराच्या वेळीं म्हटलीं जाणारी लोकगीतेंहि भरपूर आहेत. यांच्यांतील लोकनृत्यगीतेंहि वैशिष्टयपूर्ण व यांच्या भाषेची ओळख करून देणारी असतात.

या शिवाय सुरत, अहमदाबाद, या ठिकाणीं अहिराणी भाषिक कामधंद्यानिमित्त बऱ्याच काळापासून स्थायिक झालेले आहेत. त्यांच्या जन्मभाषेवर ग्रांथिक गुजरातीचा प्रभाव पडणें साहजिक आहे. मूळ भाषेचा येथील लोकांच्या अहिराणी भाषेचा बऱ्याच काळापासून संबंध तुटल्यानें, व गुजराथीचा परिणाम झाल्यानें सुरती, अहमदाबादी अशा उपभाषा बनल्या आहेत. मावचीवर जरी गुजराथचा प्रभाव दिसतो तरी तिच्यातहि अहिराणी लकबा भरपूर आहेत.

## अहिराणी ध्वनिदर्शन

**आहिराणी ध्वनि-**

**स्वरः**- अ, अ- अ', अऽ अँ आ उ, ऊ ए ~, ए, एऽ ओ ~, ओ, ओऽ.

**व्यंजनें—**

**कंठ्य**- क्, (क्?) ख्, ग्, घ् (ङ्)

**तालव्य**- च्,' छ्,' ज्,' झ्'

**दंत तालव्य**- च्, छ्, ज्, झ्

**मूर्धन्य**- ट्, ठ, ड्, ढ् (ण्, ण्ह्)

**दन्त्य**- त् (त्?) थ्, द्, ध्, न्, न्ह्

**ओष्ठ्य**- प्, (प?) फ्, ब्, भ्, म्, म्ह्.

**मूर्धन्य ताडित**- र्, र्ह्, (ळ्, ळ्ह्)

**दन्त्य पार्श्विक**- ल्, ल्ह्

**अर्धस्वर**- य्, व्

**अंतस्थ महाप्राण**- य्ह् व्ह्

**अंतस्थ दंतौष्ठ्य महाप्राण घर्षक**- व्ह्

**उष्मे**- श्, स्

**महाप्राण**- ह्

वस्तुतः हे वर्त्स्य (PALATO ALVEOLAR, ध्वनि आहेत. कंसांत दर्शविलेले ध्वनि अहिराणीच्या उपभाषांत आढळतात. अधोरेखित ध्वनींना अनुनासिकेंहि म्हणतातत.

अहिराणींत एकूण १४ स्वर आहेत. व उपभाषांतील एकूण ध्वनिसंख्या लक्षांत घेतल्यास ४७ व्यंजनें आहेत. तथापि ही संख्या कांहीं ध्वनींच्या महाप्राणत्वामुळें व उपभाषांतील विशिष्ट ध्वनींचा अंतर्भाव केल्यामुळ फुगलेली दिसते. यांतील कांहीं ध्वनि आजुबाजूला विशिष्ट परिस्थिति असतांनाच आपलें स्वरूप प्रकट करतात. कांहीं अनावश्यकहि असतात. इ ते ई पर्यंतच्या ध्वनींचे टप्पे अनेक असू शकतात. त्यांतील सर्व जरी बोलण्याच्या ओघांत प्रकट होणारे असले तरी त्या सर्वांची [illegible] घेण्याचे गैरसोयीचे होईल. म्हणूनच त्यांचें वर्गीकरण इ ई [illegible] ध्वनीत केलेले आहे.

**स्वरचिन्ह परिचय**

अ नेहमीच्या उच्चारांतील अ.

(१) अ हा अचा दीर्घस्वर लांबीमुळें विशिष्ट परिस्थितींत अर्थांत भिन्नत्व केव्हां केव्हां येत असल्यानें त्यास स्वतंत्र ध्वनीचें स्थान दिलेलें आहे. जलद बोलण्याच्या ओघांत अ त्याचें स्थान पटकावतो. घ-र् घरांत घरेस्मा (अनेक घरांत).

(२) अ' याची उच्चार पद्धति अ, अ- हून भिन्न आहे. दु-अक्षरीं शब्दापेक्षां मोठा शब्द असल्यास उपान्त्यस्थानीं येतो. उदा० गव' त

(३) अऽ- हा देखिल विशिष्ट परिस्थिति असतांना शब्दांनीं येतो. उदा. दिघऽ, किधऽ, फयऽ बोलनऽ इत्यादि.

याशिवाय शब्दांनी विशिष्ट परिथितींतच अगदीं अल्पकाळ टिकणारा अ॒ अहिराणींत अस्तित्वात आहे. उदा. माव्ह॒ लाव्ह॒ इत्यादि.

(४) ॲ इंग्लिश उच्चारासारखाच उदा० गॅ. (गेला) मराठींत लिहिण्याचा प्रघात ग्या असा आहे. ते कसे कसे निर्माण होतात याचें विवेचन पुढें केलेलें आहे.

(५) आ अहिराणीतील आ पुणेरी ग्रामीण मराठीहून भिन्न पुण्याच्या ग्रामीण मराठी आ त्रुटित ह्रिस्वरी असतो. ब् आ ~ आप्ले.

(६) ए ~ हा शब्दांच्या अन्त्यस्थानीच आढळतो. उदा० के, गे ह्याचा उच्चार इंग्लिश पेन प्रमाणें असतो.

(७) ओ ~ हा देखिल शब्दांच्या अन्त्यस्थानींच आढळतो. उदा० मांडो, बायको, पल्लो इत्यादि. गुजराथी आद्यस्थानिय ऑ हून भिन्न ते सोनीचा उच्चार शॉनी करतात. एऽ आणि ओऽ दुअक्षरी शब्दांत आढळतात. हे नेहमीच्या ए पेक्षा दीर्घ असतात.

पाढे परवच म्हणताना अगर पोथी वाचतांना शब्दान्ती देखील आढळतात. उदा. बेऽ एकऽ बऽऽ अहिराणांत शब्दांतीं त्रुटित ह्रिस्वर आढळतात. त्यांचा उपयोग वाक्याला विशेष महत्व जोर देण्यासाठीहि केला जातो. अधोरेखित बेऽऽ ह्यांतील ए हा वस्तुतः त्रुटित ह्रिस्वर आहे. स्वरांच्या निर्मितीचे उच्चारण पद्धतीचें विवेचन पुढें केलेलें आहे. सर्व स्वरांचा नासिक्योचार होऊं शकतो.

**व्यंजन चिन्ह परिचय—**

अहि, क् हा इंग्लिश महाप्राण क्ह हून भिन्न आहे. याचा उच्चार सर्व भारतीय क् शी जुळता आहे. क?- हा उचकी क् आहे (glottal velar stop) आहे. अन्त्य ध्वनीशीं जुळता आहे.

ङ हा भिल्लींत आढळतो त्याचा उच्चार Sing यांतील च' तालव्य यांना वर्त्स्य म्हणणेंच अधिक सयुक्तिक. संस्कृतांतील मूळ शुद्ध तालव्या ऐवजीं बहुतेक आर्य भारतीय भाषेंत वर्त्स तालव्य (PALATO-ALVEOLAR) ध्वनि आहेत.

च दंततालव्य ध्वनि चिन्ह समजावे भारतीय दोन्ही प्रकारचे च् वर्ग अल्प-घर्षक(AFFRICATE) आहेत. व ते वस्तुतः दोन ध्वनीचें मिश्रण आहे. (उदा० त्श्, त्स् इत्यादि).

ट्, ठ्, ड्, ढ् ह्यांचे उच्चार स्थाननियत आहेत व सभोवारच्या परिस्थिती-वर अवलंबून आहेत. उदा० टंक व कटाया यांतील ट् चा उच्चार भिन्न आहेत. एक ठण-ठणीत दुसरा नरमावलेला. यामुळें देखील अर्थभेद झाल्याची अहिराणीत उदाहरणें आहेत. उदा० आंड् (वृषण) अंडऽ (पक्षाचे अंडे).

ण् हा ध्वनि बागलाणींत लाडशिक्कींत आढळतो. खुद्द अहिराणी लोकवाङ्मयां-तहि आढळतो. सुशिक्षित अहिराणी भाषिक ण् चा वापर करतात. ण्, न् चा अभेद दिसून येतो.

ण्ह् हा ण् चा महाप्राण आहे त् हा इंग्लिश महाप्राणी त्ह् हून निराळा सम-जावा. त ? हा उचकी दनयध्वनि आहे. न्ह् न् चा अनाघाती महाप्राण समजावा. अना-घात असल्यास मिश्रध्वनि, व मागील स्वरावर आघात बसत असल्यास जोडध्वनि समजावा.

प् इंग्लिश आद्यस्थानीं येणाऱ्या महाप्राणी प्ह् हून भिन्न. प? प् चा उचकी ध्वनि समजावा. म्ह् म् चा अनाघाती महप्राण मिश्रध्वनि समजावा. त्याच्यामुळे मागील स्वरावर आघात बसत असल्यास त्याला जोडध्वनि समजावे.

य्ह्, र्ह्, ल्ह् हे य् र् ल् चे महाप्राण ध्वनि आहेत. उदा० पऱ्ही, ऱ्हाट, ल्हान इत्यादि व्ह् हा दन्तौष्ठच ध्वनि आहे.

ळ्, ळ्ह्, :- बागलाणी लाडशिक्को व पावरी भिल्लीत आढळतात मात्र बागलाणी लाडशिक्की ध्वनिनिर्मिती पद्धत पावरीच्या ध्वनिनिर्मिती पद्धतीहून भिन्न आहे.

श्, स्, घर्षक आहेत. त्याना ऊष्में किंवा सीत्कारी ध्वनि म्हणतात. अविरत ध्वनिवाहकत्व त्यांच्या ठिकाणी दिसून येते

ह महाप्राण याचे एकूण चार प्रकार आहेत. (१) ? उचकी ध्वनि हा नंदुर-बारी व गुजेराऊत आढळतो.

(२) ह् अल्पप्राण कठोराशी मिश्रित असणारा अघोषध्वनि.

(३) ह्' अल्पप्राण मृदुशीं व स्वरांशीं मिश्रित असणारा घोष ध्वनिस्वर-मिश्रित असतांनाहि तो घोषच असतो.

(४) ह- हा शब्दान्ती येणारा अघोष मंदध्वनि आहे.

क-र् (संक्रांतीचा दुसरा दिवस) ख-र् (घट्ट)

ग-र् (फळांचा गीर) घ-र् (घर)

च-र् (शिवण, चर) ज-र् (जरतार)

झ-र् (जहर) ट-र् (टिंगल)

ठ-र् (स्थिरता) ड-र् (भय)

त-र् (मोठी नाव तरी) थ-र् (थर)

द-र् (मोठी दरी) ध-र् (धर; उपाय योजना)

न-र् (नर) प-र् (पंख)

भ-र् (बहर) म-र् (रोग, मरण)

ल्ह-र् (लहर) व-र् (वर, नवरदेव)

स-र् (मोत्याचा किंवा पोतीचा पदर)

यांत छ्, ढ्, ब्, य्, ल्, र् श ह चे असेच शब्द भाषेंत शब्द नसल्यानें देतां आले नाहीं. त्याचप्रमाणें य्ह, व्ह्, न्ह (ळह) (ण्, ण्ह) म्ह् न्ह् चे हि शब्द नाहींत. तथापि अन्य शब्दजोडयांनीं या ध्वनींचें भिन्नत्व दाखवितां येते. त्याचा विचार पुढें केलेला आहे.

सर्व स्वरांचा नासिक्य उच्चार होऊं शकतो. म्, न् ची धृति जास्त वाढवूनहि म् न् चा उच्चार करतां येतो

समव्यंजनस्थितींतील स्वरभिन्नता झाल्यामुळें भिन्न भिन्न अर्थ झालेले शब्द—कसा क-स्, कस'र, कसऽ, कॅ (केला) कास् किस्. कीस्, कुसऽ, कूस, के (केलें) केऽस् केसऽ (अनेक केस) को- (कव् गवताचा काखेत मावणारा भारा) कोस् कोसऽ (टोचलें; टोकलें).

समस्वर स्थितींतील व्यंजनभिन्नता झाल्यामुळें भिन्न भिन्न अर्थ दर्शविणारी शब्द जंत्री.

# अहिराणी व्यंजन व्यवस्था

कंठ्य—

क, ख्, ग्, घ् जेव्हां जिभेपाठिमागचा भाग कोमल टाळूस स्पर्श करतो व त्यामुळे हवा अडविली जाते तेव्हां अहिराणी कंठ्य ध्वनींची निर्मिति होते. स्वरनालीमुखी वा अलिजिव्हीय कंठ्याहून या कंठ्याचा उच्चार भिन्न असतो. अरबी भाषेतील कायदा रखाना गाइन गरीब हे उच्चार आपल्या कंठ्याशी ताडून पाहिल्यास ही गोष्ट स्पष्ट होते प्रो. कालेलकरांनी अशा उच्चाराना अत्यतालव्य संबोधलेले आहे.

मूळ आर्य भाषेत तीन प्रकारचे कंठ्य ध्वनि होते १) कंठ्य (क) २) तालव्य कंठ्य (कि) ३) ओष्ठ्य कंठ्य क्व) संस्कृतांतील च वर्गाची निर्मिति या तालव्य कंठ्यापासूनच झाली. आपला घर शब्द हा आयर्न भाषेतील ओष्ठ्य कंठ्यापासून बनला.

इंग्लिश भाषेतील क् चा उच्चार आपल्या क च्या उच्चाराहून भिन्न असतो. तो महाप्राण मिश्रित असतो. कांतिलाल याचा उच्चार क्ऱ्हांतिलाल करतील अर्थात ख् चा उच्चार करण्यासाठी अधिक महाप्राण जोर देऊन त्यांच्या क्ऱ्ह उच्चारात मिसळतात. त्यामुळे आपला ख् चा उच्चार होऊ शकत नाही हें उघड आहे.

ज्याला आपण कंठ समजतो तेथें वस्तुत: कंठ्यध्वनींची निर्मिति अशक्य आहे. कारण तेथें हवा अडविणारें वागिंद्रिय नसतेच मुळीं.

तालुशिखर जेथें संपतें व मृदुतालुभागांस जेथें सुरवात होते अशा ठिकाणी जीभ लावून पूर्व कंठ्यध्वनि निर्माण होऊं शकतात; तथापि असा उच्चार करणें अति कठीण जाते. आर्य भारतीय आधुनिक (आ. भा आ.) भाषांतील कंठ्यध्वनि मध्यतालव्य आहेत. दृश्य मृदु तालुस जिव्हापार्श्वभाग स्पर्श करतो तेव्हां हे कंठ्यध्वनि निर्माण होतात अहिराणींत अशाच प्रकारचे कंठ्यध्वनि आहेत.

नंदुरबारी आणि गुजरात भाषेंत क् चा नवीन ध्वनि— क ? हा आहे. यास क उचकी ध्वनि संबोधतां येईल समस्वर परिस्थितींत या ध्वनिमुळें भिन्नार्थ निष्पत्ति होते. उदा— कन् (कण) क? न् (दुखावा) याच उपभाषांत त् आणि प् चे हि उचकी ध्वनि आहेत. (तान ता? न, पाट्, पा ? ट्) गुजरातीचा हा परिणाम असावा. बंगालीच्या उपभाषांतहि असे उचकी ध्वनि अस्तित्वांत आहेत.

अहिराणींत— क्, ख् कठोर, अघोष श्वास व्यंजनें
ग्, घ् ही, मृदु घोष. नाद व्यंजनें
क्, ग्, ही अल्पप्राण व्यंजनें

ख्, घ ही महाप्राण कंठ्य व्यंजनें समजावीत.

क्, ख्, ग्, घ्, हे चार भिन्न ध्वनि आहेत. कारण घोषत्व व महाप्राणत्व यामुळें शद्बांतील समस्वर परिस्थिति असतांना भिन्नार्थ निष्पत्ति होते हे सर्व ध्वनि शद्बांच्या आदि मध्य अंत्यस्थानी येऊ शकतात.

ख आणि घ् हे वस्तुतः मिश्रध्वनि आहेत. क् चा महाप्राणोच्चार म्हणजे ख् आणि ग् चा महाप्राणोच्चार म्हणजे घ् तथापि समस्वरथितीतील शब्दजोड्यांत महाप्राणत्वामुळें भिन्नार्थ निष्पत्ति होते; म्हणून भिन्न ध्वनि मानणेच इष्ट.

अहि.— क्, ख् भिन्न ध्वनि

केऽय् ( केळे ) खेऽय् ( खेळ )

केसर् ( केशर ) खेसर ( चेष्टा )

डिक्रा ( पुतण्या ) डिखरा ( ढेकूळ )

माकनी ( जात्याचा लाकडी भाग ) माखनी ( माखली )

पाक ( उभे पीक ) पाख बाजूचा भाग, चोळीचा बाजूचा भाग.

उकड ( उकडलेला जिन्नस ) उखड ( उखडणें बसण्याची ढब )

(ङ) हा भिल्लींत शेवटीं स्वर नसतांना येतो उदा. आङ् ( अंग ) इतरत्र या ध्वनीला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. स्पर्श कंठध्वनि उच्चारणस्थानाच्या थोडे मागे याचें उच्चारण स्थान आढळते. पुढें कंठ्य व्यंजन असतांना याची प्रचीती जाणवते. आंगन्, सागड इत्यादि.

तालव्य—

च्', छ्', ज्', झ्'

च्, छ्, ज्, झ्

आ. भा. आ. भाषांत मूळ आर्य भाषेतील तालव्य नाहीत. आज ज्यांना आपण तालव्य समजतो ते वस्तुतः वर्त्स्य किंवा दंतमूलीय मिश्र ध्वनि आहेत. त्श् व द्झ् हे मिश्रध्वनि जलद उच्चारले गेले की, भारतीय तालव्यांची प्रचीति येतें. यांत महाप्राण मिसळला कीं छ् आणि झ् हे ध्वनि निर्माण होतात. अहिराणींत अशा प्रकारचे ध्वनि आहेत तथापि त्यांचा वापर विशिष्ट परिस्थितीतच केला जातो. त्यांतहि समाजांतील खालचा वर्ग यांच्या ठिकाणीं दंततालव्याचा मधून मधून उपयोग करतात. अहिराणीत प्रामुख्यानें वापर वर्त्स्या ऐवजीं दंततालव्यांचाच आहे. मराठीच्या इतर ग्रामीण

भाषांतहि व खुद्द ग्रांथिक भाषेंतहि दंततालव्यानें मानाचें स्थान पटकावलेलें आहे. तें फारशीमुळें निर्माण झालें किंवा पानिनी मार्कंडेयाच्या वेळेस याचे द्विविध उच्चार अस्तित्वात असल्यानें त्या परपरेंतून निर्माण झाले हा इतिहासाचा प्रश्न आहे

दंततालव्यहि मिश्रच ध्वनि आहेत. त् स् हे जलद उच्चारले असतांना च् दंत-तालव्यध्वनीची प्रचीति येते हे स्पर्शसघर्षी आहेत हे सांगितलेले आहे.

च् छ्* वेगळाले ध्वनि

चाती ( सूत कातण्याचें उपकरण ) छाती ( छाती )

कच्ची, कच्छी.

ज, झ् वेगळाले ध्वनि

जाम् ( जाब ), झाम् ( मूर्च्छा )

वजऽ ( हळू ) वझऽ ( ओझें )

च, ज वेगळाले ध्वनि

च–य च–य (जय)

काच, काज

छ्, झ् वेगळाले ध्वनि

छ–य ( छळ ) झ–य् ( झळ )

**मूर्धन्य—**

जीभ उलटी होऊन जिव्हाग्राचा स्पर्श कठीण तालुशिखरास होतो व त्यामुळे हवा अडविली जाते त्यावेळेस मूर्धन्य ध्वनि निर्माण होतात. संस्कृत मूर्धन्याचा उच्चार करतांना ही जीभ बरीच उलटी करावी लागते व ती तालुशिखराच्या मधोमध उंच भागास लागते अहिराणी मूर्धन्योच्चार इतके टणक नाहींत. पूर्व तालुशिखराच्या उतरणीस ही जीभ लागते व ट्, ठ्, ड्, ढ् ध्वनि निर्माण होतात. या ध्वनीच्या उच्चारां-तहि दोन प्रकार आहेत- एक टणक व दुसरा नरम. टणक मूर्धन्य शब्दांच्या आद्यस्थानीं येतात व मध्य व अन्त्यस्थानीं विशिष्ट परिस्थितींत उदा. मागे अनुनासिक व पुढें दीर्घ स्वर असल्यास येतात (उदा. तंटा, घंटी उलट नरमावलेले मूर्धन्य असंस्कृत शब्द अस-तांना व अन्यस्थानी येतात. अहिराणींत या उच्चारांच्या टणक नरमपणामुळें अर्थभेद होऊं शकतो. उदा. कांड् (कांड) कांडऽ उंसाचा एक तुकडा आंड् (वृषण) आंडऽ (अंडें)

---

बागलाणांतील भिल्ल छ् ऐवजी विशिष्ट प्रसंगी उपयोग करतात. छाती >शाती अशावेळीं श् देखील छ् प्रध्वनीचा उपध्वनि मानावा लागेल.

दुसऱ्या शब्दांतील टणकपणा पुढील स्वरामुळें आलेला आहे. त्यामुळें त्याचा भिन्नार्थ झालेला आहे.

डाव व वडा हे दोन शब्द उच्चारल्यास पहिल्या ड चा टणकपणा उमगून येईल. श्री चावरिया या दुसऱ्या शब्दांतील ड् ला हिंदी ड़ सारखाच मानतात. तथापि हिंदी असंयुक्त शब्दांत मध्य अंत्यभागीं येणार हिंदी ड चा उच्चार ऱ् सारखा आहे. अशाच ठिकाणीं ( मराठी ड अहिराणी ड़ चा उच्चार ऱ् नसून नरमावलेला ड़ आहे. ड़ उच्चारताना जीभ फार उलटी करावी लागत नाही. स्पर्श नाममात्र होतो. पावरी भिल्लींत अशाच ठिकाणीं अविरत ध्वनि वाहकत्व ( Continuant ) प्रतीत होते. व त्याचा उच्चार ळ् सारखा होतो घळा, मोव्हळा, कुतळळा इत्यादि.

अहिराणी या नरम मूर्धन्याना उर्ध्व अगर अग्र वर्त्स्य म्हणावे लागेल प्रो. कृ पां. कुळकर्णी यानाहि मूर्धन्यांचे टणक व नरम उच्चार प्रकार मान्य आहेत.

तथापि मध्य व अन्त्य मूर्धन्याच्या पाठीमागें अनुनासिक नासिक्यध्वनि अगर दुसरें व्यंजन आलें असेल तर मध्य व अन्त्य मूर्धन्याचें उच्चार टणकच आढळतात उदा. कंठा, तंटा, वडा, दुश्ट, उश्ट कल्ड, पल्ड, घल्डी मात्र येथें उच्चारणस्थान बदलत नसून उलटे झालले जिव्हाग्र एरवीच्या पेक्षां अधिक वेळ पूर्व तालुशिखराशी निगडित राहते; व दाबले जाते. उच्चार भिन्न वाटतो.

अहिराणींतील पूवमूर्धन्य ट्, ठ्, ड्, ढ् आहेत. त्याप्रमाणेंच त्, थ्, द्, ध् दन्त्यादि आहेत. मात्र हें अनुक्रमें ट्, ठ्, ड्, ढ् चे उपध्वनि नाहींत हें *आपणांक ताक—टाक. ठर—थर. डाव—दाव. ढग—धग. या समस्थितींतील शब्दांच्या या ध्वनि योजनेमुळें होणाऱ्या भिन्नार्थावरून दिसून येईल. तसेंच ट्, ठ्, ड्, ढ् हे चार स्वतंत्र ध्वनि आहेत. महाप्राणत्व व घोषत्व शब्दांन विभिन्न अर्थ प्राप्त करून देतात.

| | |
|---|---|
| १. टनक- उंच निब्बर | ठणक- दुखावा. |
| २. गोटा- कवचरहित सुके नारळ. | गोठा- गोठा. |
| ३. मोटा- अनेक मोट. | मोठा- माठा. |
| ५. डीग- डिग | ढीग- ढीग. |
| ६. वडा- वडा . | वढा- ओढ. |
| ७. लड- रड . | लढ- लढ. |
| ८. ठोय- टोळ. | डोय- चार पायल्यांचे परिमाण, |
| ९. माटी- मातीं. | माडी- आई. |
| १०. ठग- स्तब्ध. ठक. | ढग- ढग. |

११. ठशी– एक दागिना. ढ्शी– हुंदडा. धक्का.

१२. आटऽ - येथें. आढऽ – आढें.

विशिष्ट परिस्थतींत शब्दांतीं येणाऱ्या अघोष महाप्राण्यांच्या ख्, ठ्, थ्, फ् व घोष महाप्राण्याच्या घ्, ड्, ध्, म् उच्चारात अनक्रमें अघोष अल्पप्राण ब घोष अल्पप्राण करण्याची प्रवृत्ति अहिराणींत आढळते. ही गोष्टही जातां जातां लक्षांत ठेवली पाहिजे. शब्दान्ती स्वर नसल्यास तर ही प्रवृत्ति भिल्लींत स्पष्टपणें दिसते इतरत्र मूर्धन्यांपुढें अघोष ह' ऐकू येतो दीट्, दीठ् इत्यादि. ट्, ठ्, ड्, ढ हे आदि मध्य अन्यस्थानीं येऊ शकतात.

ण ण्ह हें अनुनासिक मूर्धन्य बागलाणीत व लाडशिक्कींत आढळतात. हें शब्दारंभी येत नाहीत. ण् व ण्ह् हें भिन्न ध्वनि आहेत समस्थिति असणाऱ्या शब्दात केवळ या ध्वनीच्या योजनेमुळे अर्थभिन्नता आढळते.

ताणा ( ताणा ) ताण्हा ( तान्हे )— लाडशिक्की.

कणा ( कणा ) कण्हा ( कण्हला )— बागलाणी.

कोनी ( बाळंत ) कोण्ही कोणाची.

दन्त्य— जिभेचा स्पर्श वरच्या दाताच्या मध्यभागास होऊन हवा अडविली जाते. त्यावेळेस त्, थ्, द्, ध् सारख दत्यध्वनि निर्माण होतात. इंग्लिश दंत्याहून हे दंत्यध्वनि निराळे आहेत. इग्लिश दंत्याचा उच्चार त्ह् असा आहे. व तो उच्चार आपल्या थ् हून भिन्न आहे. नवापूर तळोदे शहादे येथील गुजराऊंत मात्र उचकी त्? दन्त्यध्वनि अस्तित्वांत आहेत.

संस्कृतातून प्राकृतांत येतांना शब्दांतर्गत कठोर महाप्राणांतील व्यंजनाचे दुवे निखळतात व त्या ठिकाणी फक्त महाप्राण उरतो. नंदुरबार दोंडायचे वगैरे भागांतील अहिराणींत असे शब्द व्यंजनांत असतांना व शब्दांचा उच्चार करतांना वह्, त्ह्, प्ह्, अशा प्रकारचे उचकी ध्वनि ऐकूं येतात. अशा दंत्यांचीं उदाहरणें—

ता? न – तृष्णा तण्हा. मराठी तहान.

तान् – लकेर. थान – स्तन

यांतील त? त्, थ्, हें वेगवेगळाले ध्वनि आहेत. तिन्ही शब्दांत समपरिस्थिति असूनहि भिन्नार्थ निष्पत्ति केवळ त? त्, थ्, या ध्वनि योजनेमुळे झालेली आहे. मात्र गुजराती सारखे मृदु महाप्राणांतील मृदु व्यंजनाचें अस्तित्व नाहिसें झाल्यामुळे निर्माण झालेले द्ह ब्ह सारखे ध्वनि या नंदुरबारी अहिराणींतहि नाहीत गुजरातींतील व्हेन् सारखे ध्वनि

यांतील व्ह् ब् व भ हून वेगळाली आहे. नदुरबारी अहिराणींत व गुजराऊंत हे उचकी ध्वनि गुजरातीच्या संपर्कानें आलेलें असावेत. ग्रामिण मराठीत अशा प्रकारचें ध्वनि नाहींत. सस्कृतांतून प्राकृतांत अवतारतांना कठोर व मृदु महाप्राण ताल कठोर व मृदु व्यंजनांचे दुवे निखळताना महाप्राण उठतात व नंतर ग्रामिण मराठीत अद्याक्षरें क्, ग्, त्, द्, प्, ब्, ऐवजी पुढील ह् कारामुळें अनुक्रमें ख् ध् थ् ध् फ् भ् बनतात व या पुढील शद्बातर्गत ह् कार लोप पावतो.

फूडे — प्रथम. मराठी पुढें.

फाटे — प्रभात

भायेर — बाहेर.

भईन — भगिनि बहिणी इत्यादि.

अहिराणीताल त्, थ्, द्, ध् हें दंत्यध्वनि मराठीहून भिन्न नाहींत मात्र नगरी ग्रामिण मराठात जिभेचा स्पर्श दंतमध्यास अहिराणीपेक्षा अधिक काळ टिकतो. मावळी ग्रामीग मराठा ध्यें जिभेचा स्पर्श दतमध्यास न होता थोडा वर दंततालव्याची निर्मिति हात. त्या ठिकाणीं होतो. करतुया दायुा मरत्यात त्यॅल इत्यादि शद्बाच्चारांत तालव्याचें अस्तित्व व त्वाड स.रखे शद्ब उच्चारताना होणारी मावळी ग्रामिणाच्या जिभेची हालचाल यावरून वरोल गोष्ट स्पष्ट होईल.

त्, थ्, द्, ध् हे चार स्वतत्र ध्वनि आहेत. समपरिस्थितींतील या ध्वनि योजनेमुळें होणारी अर्थ भिन्नता माझ्या विधानास पुष्टी आणते. घोषत्व व महाप्राणत्व यामुळेच अर्थ भिन्नत्व प्रतीत होते.

१) त्, थ् वेंगळाले ध्वनि.

ताम्— गव्हाचा रवा काढताना निघालेला तांबडा कोंडा.

थाम्— थाबणें. मात्नी ( माजली ) माथनी ( मेथनिका )

तीर— नदी कांठ. बाण. पोती– पोथी. थांर– स्थित.

२) द्, ध् वेगळाले ध्वनि.

दाड्– जुन्या वस्त्राचा सांधा. धांड्– खच्ची न केलेला बैल.

दूड्– रास. धूड्– अवजड वस्तु, प्रेत.

दम्– दम. धम्– लहान विवर, बिळ·

३) त्, द् वेगळाले ध्वनि.

तान्– लकेर. दान्– जनावरांचे खाद्य.

ताम– गव्हाचा तांबूस रवा. दाम्– पैसा.

४) थ्, ध् वेगळाले ध्वनि.

थाटी- ताटली. धाटी- पद्धत.

थडी- नदी किनारा. धडी- धान्य परिमाण.

ख्, घ्, छ्, झ्, थ्, ध्, ठ्, ढ्, फ्, भ् यांना प्रो कृ. पां. कुलकर्णी मिश्र साधे उच्चार समजतात ते योग्यच. जोशीसारखे व्याकरणकार हें वरील व्यंजनांना सयुक्त उच्चार मानतात. तथापि ख् घ् आदि महाप्राण व्यजनें संयुक्त मानल्यास ष्ट, स्त, प्स प्रमाणेंच मागील स्वर द्विमात्रक व्हावयास पाहिजे पण अखिल रथ इत्यादींत ख थ मागील स्वर ऱ्हस्वच राहतो स्वराचा उच्चारणकाळ लांबत नाहीं वरील नियम लक्षांत घेतल्यास अहिराणीतील वरील व्यंजनांना व न्ह्, म्ह्, व्ह्, ल्ह् याना संयुक्त व्यजनें मानतां येत नाही. अस्त, कष्ट, भ्रष्ट अर्क प्रमाणें पूर्वाक्षरावर आघात नसतो. म्हणजेच मागील स्वर द्विमात्रिक करण्याचें सामर्थ्य नसते. त्यामुळे याना महाप्राणयुक्त असल्यानें देखील मिश्र वगळाले ध्वनि म्हटले आहे.

र्क, स्त, स्म, उच्चारताना प्रत्येक अवयव गणित ज्या प्रमाणें उच्चारणस्थान बदलते तसे न्ह्, व्ह्, म्ह्, ल्ह्, उच्चारताना उच्चारणस्थान बदलत नाहात त्याचाच अर्थ हा व्यजने एकमात्रिक तर आहेच पण ता मागाल स्वर एकमात्रिक असल्यास द्विमात्रिक करण्यास असमर्थ असतात हो व्यंजने आदि मध्य अन्त्यस्थानो येऊं शकतात याच नियमाप्रमाणे मध्य व अन्त्यस्थानी येणारें ळ्ह् व बागलाणी लाडशिक्कीतील ण्ह् भिन्न साधे उच्चार आहत. गुजराऊंतील नदूरबारी अहिराणीतील विशिष्ठ परिस्थितीत येणारे व्ह् त्ह् प्ह् उचकी ध्वनि ह देखील मिश्र साधे उच्चार समजावे. हा व्यजने आदि मध्य स्थानीच मात्र यतात. अन्त्यस्थानी कधीही येत नाहीत. विशिष्ट परिस्थितींत हा संयोग एकजीव झालला असतो. मात्र जोडाक्षरा प्रमाणें पूर्वावर आघात देण्यास असमर्थ असतो.

कन्—कण. (कऽन्) दुखावा. खन- विशिष्ट नियम. खण. कर-करष्टमी (कऽर)- कहर. खर-लहान मुलाची पांढरी धट्ट. याशिवाय नंदुरबारींत व गुजराऊंतहि न्ह, म्ह, व्ह, ल्ह, ऱ्ह हे मिश्रसाधी व्यंजनें आहेतच. व ते आदि मध्य अत्यस्थानीं अहि. नंदु. गुजराँऊत येऊ शकतात. ऱ्ह आद्यस्थानी यऊं शकत नाहीं. न्, न्हः- यांचा उच्चार स्वतंत्र करताना जीभ दन्त्य व्यंजनाप्रमाणेंच वरील दांतांच्या मागील बाजूस दन्तमध्याच्या किंचित वरच्या भागास लावावी लागते या न् न्ह् शिवाय दन्त वेष्टनास लागून दन्त तालव्य व्यजनाचे अनुनासिक— अहिराणीत अस्तित्वात आहे. मात्र तो न् न्ह् प्रमाणें स्वतंत्रपणें शब्दांत वापरतां येत नाहीं. उदा.- पंच न् चा दंत्य नासिक्यध्वनि म्हणूनहि शब्दांत उपयोग होता. मराठीच्या सर्व ग्रामीण भाषेंत दंततालव्य नासिक्यध्वनि अर्थात

वर्त्स्य प्रभावित आहे. मात्र त्याला न् न्ह् प्रमाणें अनुनासिक्यध्वनि म्हणून स्वतंत्र अस्तित्व नाही व आदि मध्य अन्त्य स्थानीं त्यांच्याप्रमाणें स्वतंत्रपणें वावरतहि नाही. दंततालव्याचा पुढें आसरा घेतल्या खेरीज तो भाषेंत वाटचाल करूं शकत नाहीं. शब्दान्ती तालव्य स्वर असलेल्या शब्दातहि हाच उच्चार भाषेत तालव्य ञ् ची जागा घेण्याचा केव्हां केव्हां प्रयत्न करतो.

बहुतेक ग्रंथकार या दंततालव्य न् ला दंत्य न् हून भिन्न समजत नाही ह्याचा समावेश ञ या प्रतिध्वनींत होत नसल्यानें व न प्रतिध्वनींचाच न न्ह न प्रमाणें उपध्वनि असल्यानें त्यांची ही समजूत खरोहि आहे

अहिराणीच नव्हे तर मराठीच्या इतर ग्रामीण भाषेंत मूर्धन्याक्षरा मागील नासिक्य ध्वनि ठगठणींत ण् नाहीं. तो इतका केव्हां केव्हां नरमावतो को त्याचा उच्चार दंत्य न प्रमाणें ऐकू येतो. म्हणून त्याला मूर्धन्य प्रभावित म्हणता येईल मूर्धन्यांचे उच्चार संस्कृतप्रमाणें ठगठणीत नसल्याचा हा परिणाम असावा

घंटा — घन्टा- कंठी — कन्ठी. अंड — अन्ड.
या न सहि न् प्रध्वनोचाच उपध्वनि मानणें क्रमप्राप्त आहे

अनुनासिका बाबतच्या अहिराणींत व इतर ग्रामिण भाषेतील तीन प्रवृत्ती लक्षांत ठेवल्या पाहिजे.

१) आकारान्त शब्द असल्यास अन्त्य व्यंजनाचा अस्त करून तत्पूर्वीचा अननासिक स्वतंत्रपणें मिरवतो. सबन् (सबंध) गन् (गंध) आङ् (अंग) खाम् (स्कंभ, खांब)

२. स्पष्ट अनुनासिक ध्वनिऐवजी मागील स्वारांचे अनुनासिकीकरण करण्याचो प्रवृत्ति. ही प्रवृत्ति कोंकणींत कारवारींत प्रकर्षानें दिसून येते घाटावरील ग्रामिण भाषेंत क्वचितच दिसून येते. यांत अन्त्य व्यंजनाचा अलग उच्चार ऐकू येतो.

तिसरी अनुनासिकाचाच लोप करण्याची प्रवृत्ति.

चीच्- चिन्च, पाच्- पन्च, दात्- दन्त इत्यादि. या संबंधीच्या कारणाचें विवेचन अहिराणीची घटना या ग्रंथांत केलेले आहे

न्, न्ह् हें मात्र वेगळाले ध्वनि आहेत. व ते शब्दाच्या आदि, मध्य, अत्यभागीं येऊं शकतात. न्, न्ह् हें मृदु नाद किंवा घोष आहेत. अन्त्य न्ह् मात्र पुढें स्वर नसतांना किंवा ठसठशीत उच्चार होत नसतांना अघोष वाटतो. उदा.- कन्ह्- दुखावा.

अहिराणींत बऱ्याच वेळां न् ऐवजी न्ह् वापरले जातात. उदा.- कर्न्हार, करनार. मन्हा- मना. तरी पण शब्दांशब्दांत समपरिस्थिति असतांना केवळ या ध्वनि-

योजनेमुळें वेगळाले ध्वनि होतात त्यामुळें हें वेगवेगळाल्या ध्वनिसमूहांतील आहे असें मानावे लागते.

नानी– धाकटी चुलती. न्हानी– स्नानगृह.
मन— मनें मन्हऽ— माझें.
काना– चकणा. कान्हा– कृष्ण.

न्ह् हें संयुक्त व्यंजन नाहीं त्याचा उच्चार मिश्र साधा असा आहे हें आपणांस मन्हऽ या उदाहरणावरून दिसून येईल मन्हऽ यांतील म मधील अ एकमात्रक आहे. हा पुढील न्ह् मुळें द्विमात्रिक झालेला नाही. क-न्ह् व कष्ट यां शब्दांतील शब्दारंभीच्या दोन्ही अ चें स्वरूप असेच भिन्न आहे. क-न्ह् यातील अ हा धना यातील ध मधील अ पेक्षां जीर्ण असूनहि कष्ट यांतील क मधील अ सारखा नाहीं. यामुळें न्ह् हा पुढें स्वर नसल्यानें अघोष झाला।

याशिवाय बागलाणी लाडशिक्कीत ण् आणि ण्ह् हें न न्ह् प्रमाणेंच दोन वेगळाले ध्वनि आहेत. मात्र दोन्ही शब्दारंभी येऊं शकत नाही. गुजराती मराठींत राजस्थानींतहि शब्दारंभी ण येत नाहीत. प्राकृतातहि क्वचितच शब्दारभी ण् आलेला आहे. असें आढळते बागलाणीत न् ण् अमुकच नियमानें शब्दांत येतात असें नाहीं. मराठी प्रमाणेंच सकेताच्या आसयानेंच वापरांत आणावें लागतात. तीच गोष्ट लाडशिक्कीची मात्र लाडशिक्कींत न् पेक्षां ण् ची प्रचुरता अधिक बागलाणी कधीं कधीं ण् बाबतीत मराठीच्या पावलाधरपाऊल टाकते तर कधीं कधीं अहिराणीच्या वळणावर जाते. तसें पाहिल्यास मराठीच्या पूर्वा वयावावरील आघातामुळें द्विमात्रक मानतो. एरवी उच्चारणकाल प्लुत सारखा स्वर लांबविल्यानें लागणाऱ्या उच्चारण कालापेक्षां कमीच असतो. दुष्ट, दुःख यांतील दु चा उच्चारण काल व दूख दूषण यांतील दू चा उच्चारणकाल यांत ऊ चा उच्चारणकाल पहिल्या साघात दु पेक्षां जास्त आहे. या साघात दु मुळें दुष्ट दुःख यांतील अंत्य ष्ट ख मध्यें अ स्वराची स्पष्टपणें जाणीव अहिराणींत व मराठींत होते. हिंदीत मात्र दुष्ट दुःख यांतील दु चा उच्चारणकाल दू सारखाच द्विमात्रिक आहे. अर्थातच ष्ट आणि ख मधील अ नाममात्र असतो. द्विमात्रिकातहि उच्चारण कालाची लांबी कमी जास्त असूं शकते. उदा,– देवः देवाः इतके सूक्ष्म भेद बाजूला टेऊन सोयीसाठीं एकमात्रकं द्विमात्रक संज्ञा वापरली आहे. सर्वच ग्रामिण भाषा न् प्रधान. ग्रांथिक मराठींत जेथें ण् येतो तेथेंहि न मराठीच्या ग्रामीण भाषा बिनदिक्कतपणें वापरतात. गुजराथी ण् प्रधान तर अहिराणी, बागलाणी, वऱ्हाडी व मराठीच्या इतव ग्रामीण भाषा न् प्रधान हें वैधर्म्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे. खुद्द ग्रांथिक मराठीत गुजराथीपेक्षां

ण'चा वापर कमीच. बागलाणींत न् प्रध्वनीचा ण् उपध्वनि आहे बागलाणींतील लाडशिक्कींतील व वरच्या समाजांतील अहिराणी बोलींतील ण् हा पूर्वमूर्धन्य आहे. लाडशिक्कींत ण हा प्रध्वनि आहे. न न हा उपध्वनि आहे. मराठी ज्या ठिकाणीं न वापरते अशा ठिकाणींहि लाडशिक्कींत ण वापरला जातो. उदा.—

घना बद्दल धण' सोना बद्दल सोणा.

लाडशिक्की बागलाणींतील ण ण्ह् हें वेगवेगळे ध्वनि आहेत. ण् चा महाप्राण ण्ह् आहे व त्यामुळें समस्थितींत या व्यंजनाच्या वापरामुळें भिन्न अर्थ होतो. बागलाणीत शब्दारंभी मात्र ते कधींच येत नाहींत. व लाडशिक्कींतहि शब्दारंभी अगदीं क्वचितच बोलण्याच्या ओघांत येतात. बोलणाऱ्यांची विशिष्ट लकब समजावी.

कणा– मोटेचा भाग कण्हा– कण्हला, कोण– राकडे, कोण्ह– कोणाचे,
ताणें– ताणले, ताण्ह– तान्हें.

अहिराणी बागलाणींत षष्ठीचे प्रत्यय ना, नी, नं किंवा न्हा, न्हो, न्हे आहेत तर लाडशिक्कींत णा, णी, णे किंवा ण्हा, ण्ही, ण्णे आहेत. पुढें प्रत्यय अगर स्वर नसतांना ण्ह मधील ह हा अघोष असतो. उदा.— कण्ह्– दुखाबा.

अहिराणींत ज्याप्रमाणें न् बद्दल न्ह् हें चलन चालतें. त्याप्रमाणेंच बागलाणी लाडशिक्कींत बऱ्याच वेळां ण् बद्दल ण्ह् हें चलन चालतें. असें असूनहि ण बद्दल ण्ह् हें वेगवेगळाले ध्वनि मानले पाहिजे. दोन शब्दात समपरिस्थितीत या ध्वनि योजने-प्रमाणें भिन्नार्थ निष्पत्ति कशी होते हें आपण वर पाहिलेंच आहे. खुद्द सुशिक्षित अहिराणी भाषिक न् ण्, ण् ण्ह् यांचा ग्रांथिक मराठीच्या प्रभावानें सरमिसळपणें वापर करतात, लोकवाङ्मयांतहि हाच प्रकार दिसतो.

**ओष्ठ्य ध्वनि—**

जेव्हां दोन्हीं ओठ मिटून हवा अडविली जाते त्यावेळेस प्, फ्, ब्, भ् सारखे ओष्ठ्य ध्वनि निर्माण होतात. गुजराती ओष्ठ्य ध्वनि उच्चार पद्धति भिन्न आहे. गुजराती ओष्ठ्य ध्वनि उच्चारतांना वरील ओठांचीहि खालच्या ओठाइतकीच हालचाल होते. इतकेच नव्हे तर व्हेन सारख्या शब्दांतील व्ह् चा उच्चार अतस्फोटक वाटतो. अहिराणी ओष्ठ उच्चार निर्मितींत खालचा ओठ प्रामुख्यानें भाग घेतो. गुजराथी इतकेच ओठांचें प्रकुंचन नसते वरील ओठांची हालचाल मंद असते. म्ह्, व्ह् सारखे ध्वनि उच्चारताना ओठांचें प्रकुंचन आढळते. मावळी व नगरीत ओष्ठ्य ध्वनींचे उच्चार करतांना ओठांचा स्पर्श अधिक वेळ होतो व दाबहि अधिक असतो.

महाप्राणत्व व घोषत्व यामुळें समस्थितींतील शब्दांशब्दांत भिन्नार्थ निर्माण होतो.

१ प्, फ् वेगळाले ध्वनि.—
पाटी- स्लेट पाटी, फाटी- फांदी, पूस- पौष, फूस- प्रेरणा; अंग असणें, माप- माप; उमण परिमाण, माफ्- माफ़ * (फारशी)

२ ब, भ् वेगळाले ध्वनि—
बाट- भ्रष्टता, भाट- बोलका भाट, बासन्- भांडें, भासन्- भाषण, बट्टं- पीठ कालवून केलेली आमटी, भट्टं- ब्राम्हण, बोर्- बोर, मोर्-चौकोनी तरट अखिल.

३ प्, ब् वेगळाले ध्वनि—
पान्- पान साप, बान्- बाण, पल्डे- मोटी डालकी. बल्डे- बरड जमीन

४ फ् भ् वेगळाले ध्वनि—
फुई- आत्या, भुई- भूमि.

म् म्ह्—
मृदु घोष अनुनासिक ध्वनि.

हे दोन्ही वेगळाले ध्वनि आहेत. यांचा उच्चार दोन्ही ओठांच्या शहाय्यानें होतो. म्हणून त्याना ओष्ठय अनुनासिक वर्ण म्हणतां येईल शब्दाच्या आरंभी मध्यभागीं व अंत्यस्थानी ते स्वतंत्रपणें येऊं शकतात. पुढें प्, फ्, ब्, भ्, म् ध्वनि आला असतांना म् चा अनुनासिक परसवर्ण म्हणून उपयोग करण्यांत येतो. तत्सम किंवा अर्धतत्समांत मागे न्हस्व स्वर असेल तर नियमानें म चा अनुनासिक परसवर्ण म्हणून उपयोग होतो. उदा.— सम्पत, चम्पा लेखनांत मागील स्वरावर बिंदू देऊन दर्शविण्याची पद्धत आहे. मागील स्वराचें अनुनासिकीकरण अहिराणीत अल्प अल्प असतें. तेहि पुढें स्वर विरहित व्यंजन आलेलें असतांनाच. स्वरमिश्रित व्यंजन आलें असतांना मात्र अनुनासिक पपसवर्ण उच्चार स्पष्ट टळटळीतपणें ऐकूं येतो. कोंकणींत अशा

* अन्त्यस्थानीं पुढें स्वर नसतांना फ् भ् यांतील महाप्राण अस्पष्ट असतात ही प्रवृत्ति मागे सांगितलेली आहेच. बऱ्याच प्रसंगी महाप्राण लोपहि होतो.

परिस्थितींतहि मागील स्वराचें अनुनासिकीकरण होते. अहिराणी स्वराचें अनुनासिकीकरण तत्सम हंस उच्चारतांना दिसून येईल. (हँडस्) उलट आंबा शब्दात आम्बा. आ स्वराचा नासिक्योच्चार होत नाहीं. कोंकणींत आँबा परसवर्णोच्चारा बरोबरच स्वराचाहि नासिक्योच्चार होतो. केव्हां केव्हां अहिराणीत अनुनासिक पर वर्ण मृदु घोष ध्वनीस बाजूला सारून स्वतंत्र अनुनासिक म्हणून मिरवतो. हिंदीतहि हा प्रकार आपणास पहावयास मिळतो.

खाम– स्कम्स, चम्हार– चर्मकार

श्री. दामले यांनीं बिंदु अनुस्वार अनुनासिक या विषयी सविस्तर वर्णन शा. म. व्या. पृ. २८ ते ४१ यात केलेलें आहे. कोकणस्थात ओझरता उच्चार म्हणून अनुनासिक उच्चार असतो तर देशस्थांत खणखणीत स्पष्ट उच्चार म्हणून अनुस्वार असतो. असें त्यांचें म्हणणें आहे एका बिंदुमुळें अनुनासिक व अनुस्वार दर्शविला जातो. त्या ऐवजीं स्वतत्र चिन्हें असण्याची आवश्यकताहि त्याना पटविलेली आहे.

सर्वांशीं– सर्व अंशीं. सर्वांशी– सगळ्याबरोबर त्यानी ही दिलेला उदाहरणें बरोबर आहेत.

सर्वं स्वरांचा हा सानुनासिक उच्चार करूं शकतो. एरवी पांचहि वर्गातील वर्गातील अनुनासिकांच्या सहाय्यानें स्परांचा नासिक्योच्चार करतां येणें शक्य आहे. अं, आं, इं, उं — अम, आम, इम, उम इत्यादि येथें ˙ ˘ खुणा लक्षांत ठेवाव्या.

अनुस्वार ही सर्वसाधारण आहे. पण पुढील व्यंजनावर ते अनूनासिक कोणत्या वर्गातील हें ठरवितां येते. अंक– अङ्क, कंठ– कण्ठ.

म् आणि म्ह् वेगवेगळाले ध्वनि.

म् मृदुघोष महाप्राण ध्वनि.

म्ह् मृदुघोष महाप्राण ध्वनि.

मान– मान सन्मान. म्हान– मध्यें.

मन्– णन्, मण. म्हन्– म्हण.

मनऽ– मनें, मनऽ– माझें.

राजकुमार– राजपुत्र, राजकुम्हार– राजाचा आश्रित कुंभार.

शब्दान्ती येणारा म्ह् मधील ह् पुढें स्वर नसल्यास अघोष असतो. तुम्ह्, आम्ह्, म्ह् याचा मिश्र साधा उच्चार आहे. त्याचा मागील स्वरावर परिणाम होत नाहीं. व मराठी ब्राह्मण यातील म्ह् उच्चारतांना ज्याप्रमाणें म् आणि ह् उच्चारतांना भिन्न उच्चारण स्थानाची जाणीव होते, तशी जाणीव अहिराणी म्ह् उच्चारतांना होत नाहीं. पूर्वावयव साघात करण्याची व तदनुषंगानें द्विमात्रक करण्याचें सामर्थ्य अहिराणी म्ह मध्यें नसल्यानें तो ख्, घ्, फ् प्रमाणेंच स्वतंत्र ध्वनि समजावा.

मराठी— कुंभार. ५ मात्रा.

अहि — कुम्हार यांत कु द्विमात्रक नाहीं.

मराठींतहि म्ह् विषयी विकल्प आहे शा. म. व्या. ६०. तुम्ही– ४ मात्रा. तुम्ही– ३ मात्रा. मराठी कवितेंत कवी या बाबतीत वृत्तरचना निर्दोष करण्यासाठीं अशा विकल्पाचा आश्रय घेतलेला नेहमी आढळून येतो.

अहिराणीत बऱ्याच वेळां म्ह् ऐवजी म् वापरतात. उदा.– बामन्, बाम्हन्. मसनवट– म्हसनवटी. लामन्- लाम्हन् मान- म्हान् सन्मानदर्शक श. यो अव्यय. तथापि शब्दाशब्दांत समपरिस्थितीत असतांना भिन्नार्थ निष्पन्न झालेल्यांची उदाहरणें भर पूर असल्यानें म् आणि म्ह् याना एकाच ध्वनिसमूहाचें उपध्वनि न मानतां वेगवेगळाले ध्वनीच मानावे लागतात. उपभाषा व ग्रांथिकभाषा संघर्षानें उच्चारांत विकल्प आढळतो एवढेंच.

संस्कृतांत अनुनासिक व अर्धवर्ण याचे महाप्राण नाहींत. ते मराठीत असल्या- बद्दलची ग्वाही प्रा. कुलकर्णी यांनीं दिलेली आहेत. उदा०— कण्हेर, पन्हे, म्हाळसा, नव्हे तेव्हा इत्यादि. याला अपवाद त्यानीं य चा सांगितलेला आहे य चा महाप्राण मराठींत नाहीं व त्याचा पूर्ववर्ण या नात्यानें ह् काराशीं संयोगहि होत नाहीं. न्ह्, ण्ह्, म्ह वगैरेंचा अस्तित्व मान्य करून त्यांनीं या वर्णांना वर्णमालेंत स्थान कां देऊं नये याचे आश्चर्य वाटते.

अहिराणीत य् चा महाप्राण असावा पुढील एका उदाहरणात ही गोष्ट दिसून येते. पय्हे. फलहि– कापसाचें शेत

मराठींत सह्य सह्याद्रि, वाह्यात सारख्या शब्दांत मागील स्वरावर आघात होतो. साघात ह्य मागील अक्षर साघात उच्चारतांना य चा अवलंब करावा लागतो. पूर्ववर्ण या नात्यानें ह् काराशीं संयोग होत नाहीं हें श्री. कुलकर्णी याचे विधान कोल- मडून पडते. सयह्याद्रि वायह्यात स ह्य. इत्यादि. मात्र दह्यांत यांतील ह्य मागील द तील अ साघात नसल्यानें य ची मदत घेतली जात नाहीं. य च्या महाप्राण बाबत अधिक संशोधन होणें जरूर आहे.

य अर्धस्वर किंवा अंतस्थ मृदु नाद अल्पप्राण ध्वनि.

य शब्दाच्या आदि मध्य अंत्य स्थानीं येतो.

य चा उच्चार करतांना वरचे दांत व खालचे दांत एकमेकांच्या जवळ येतात. पण ओठ मिटावे लागत नाहीत ओठांत अंतर राहते. संस्कृत य चा उच्चार करतांना ओठासंबधीची हालचाल स्पष्टपणें दिसते. त्यामुळें संस्कृत य् हा अहिराणी य् पेक्षा अधिक घर्षक ग्रांथिक मराठीतील अर्थात सुशिक्षितांच्या उच्चारांतील य संस्कृतच्या वळणावर गेलेला दिसतो य् पुढे इ ई ए ऐ असताना य् चा उच्चार घर्षक शुद्ध तालव्य असतो. तसेंच दिव्य कर्तव्य हव्य पुण्य इत्यादि जोडाक्षरांतील उच्चारहि घर्षक शद्ध तालव्यच आहे ओष्ठ संधीची हालचाल स्पष्टपणें दिसते. ओष्ठ संधीं मागे सरकतांना आढळतात. पेशवे कालात यशवंत चा उच्चार येशवंत होतो. तो य् चें हें घर्षक शुद्धतालव्य स्वरूप राखावे यासाठीच जीभेचें पृष्ठ वर उचलले गेल्यानें जीभ व टाळू यात फट कमी राहते. व घर्षकत्व प्रतीत होते श्री. कालेलकरांनीं मराठी य ला घर्षक मानलेले आहे.

अहिराणी य चा उच्चार मराठी गाय माय यांतील य प्रमाणें आहे. हा य, घर्षक शुद्ध तालव्य य पक्षां सौम्य आहे. याचा उच्चार करतांना जिभेचे टोकाची कड खालच्या दातास स्पर्श करत जिव्हापृष्ठ घर्षक शुद्धतालव्य सारखे वर टाळूकडे उचलले जात नाही. जिभेच्या कडा खालील दातांच्या चद्रकोरांच्या बाजूना स्पर्श करतात. कठीण टाळू व जीभ यात फट बरीच राहते. त्यामुळें अहिराणी य् हा अल्प घर्षक आहे. इ ई ए ऐ तालव्य स्वराशी अन्वित असतांना मात्र य चे घर्षकत्व प्रतीत होते. व या वेळेस वरील दाताच्या चद्रकारोची टोकेंहि जिभेच्या कडांना स्पर्श करताना आढळतात. याशिवाय अहिराणींत मराठी क ऐवजी येणारा पार्श्विक य आढळतो. या य चा उच्चार वस्तुत. माय गाय यम यमुना यांतील य पेक्षां भिन्न आहे. या य चा उच्चार करतांना जिभेचा शेंडा खालील दाताना स्पर्श करीत नाहीं. तो मागे सरकतो. जीभ अहिराणी ट ठ ड ढ जेथें निर्माण होतात त्या टाळूकडे वर उचलण्याच्या प्रयत्नांत असते. हा य उच्चारतांना जिभेचा शेंडा मागें सरकतांना दिसतो. जिभेस उथळ चमच्याचा आकार येतो. हवा कडा-वरून वाहते. या चमच्याचे पुढील टोंक खालील दातांस स्पर्श करीत नाहीं. व शेंडा अधांतरी खालील दंतमूलाकडे तोंड करून लोंबत असलेला दिसतो. मराठींत शब्दान्तर्गत भागीं शब्दान्ती संस्कृत असंयुक्त ल ऐवजीं ळ होतो. तथापि अहपिराणीत या अशा ठिकाणी य् आढळतो.

मराठी — कमळा नळी दिवाळी कळ फळ.

संस्कृत — कमला नलिका दीपावलि कला फल या अर्थी शद्ब आहेत.

अहिराणी कमया नयी दिवायी कय फय असें होतात. इ किंवा ई शीं अन्वित असतांना य घर्षक असतो. यि यी तील य चा घर्षकपणा नष्ट झाल्यास यि यी ऐवजी इ ई असें स्वर ऐकू येतात भिल्लांच्या भाषेत आपणास दिवाई नई चोई असें उच्चार ऐकू येतात ते यामुळेच शृंखलिका — संखलिआ. साकयी — साकई. साकी असें संक्रमण झाले आढळेंळते.

अहिराणी पार्श्विक य चे फ्रेंच भाषेतील पर्श्विक ल शीं साम्य आहे यांतील ल् चा उच्चार फ्रेंच भाषेंत य होतो. हल्लीं ग्रांथिक भाषेशीं सतत संबंध व संघर्ष येत असल्यानें शिक्षित व मध्यम वर्गांत पार्श्विक य व नेहमीचा य यातील उच्चारांतील भेद दिसेनासा झालेला आहे. खेड्यांतील अहिराणी भाषा बोलणाऱ्या जनतेंत य् च्या या दोन सूक्ष्म उच्चारांची जाणीव भाषा ऐकतांना येते. ज्याअर्थी पार्श्विक य बद्दल य साधा वापरला जातो. त्याअर्थी पार्श्विक य ला स्वतंत्र ध्वनि ऐवजो य चा उपध्वनीच मानणें इष्ट आहे. नलयऽयांत य् चें व्यंजनमय स्वरूप जाऊन स्वरमयत्व प्रतीत होते.

या शिवाय अहिराणींत ऱ्ह न्ह ल्ह प्रमाणेंच विशिष्ट परिस्थितींत असा मिश्रसाधा उच्चार आहे. श्री. कृ. पा. कुलकर्णी मराठींत याचे अस्तित्व मानीत नाहीत. पण खालील उदाहरणावरून अहिराणींत य्ह ला स्थान आहे हें पटेल.

पय्हे — कापसाचे शेत. बागलाणे पळहे. संस्कृत — फलहि.

पय्ही — पळेल. बागलाणी पळ्हि.

वय्ही — वळेल. बागलाणी वळ्ही.

कय्ही — कळेल. बागलाणी कळहो.

वऱ्हाडी अहिराणींतहि रह हा ध्वनि आहे. बहिणाबाई चौधरीच्या गीतांत अशा ध्वनींची पुष्कळ उदाहरणें आढळतात. खुद्द सोपानदेव चौधरी बहिणाबाईच्या कविता म्हणतांना य्ह असाच उच्चार करतात उदा- याय्हले — ह्यांना. य्ह् शद्वारंभी मात्र येऊ शकत नाहीं. अहिराणींत केव्हां केव्हां य्ह ह्य या उच्चारांची अदलाबदल मराठींतील न ण प्रमाणेंच दिसून येते.

य्ह् ह्य् चें दोन दोन प्रकारचें उच्चार आहेत. एक मिश्र साधा उच्चार व दुसरा मागील स्वरास धक्का देणारा संयुक्त उच्चार. मिश्र साध्या उच्चारांची य्ह चीं उदाहरणें वर दिलेली आहेत.

ह्य् मिश्रसाधा उचार.

वहया. कहया. सहया. इत्यादि.

य्ह ह्य संयुक्त उच्चार.

हा उच्चार होतांना मागील स्वरावर आघात तर होतोच पण हा आघात होतांना य ची मदत घ्यावी लागते. उदा.—

सह्याद्रि साह्य इत्यादि.

कांहीं तत्सम शब्दांचे उच्चार य् च्या मदतीनेंच होतात.

सय्योग— सय्यम असे आहेत

वर्त्स्य भागास जिभेचा स्पर्श होऊन ल् निर्माण होऊं शकतो. हिंदी ल्, ल्ह् अशा प्रकारचे आहेत हिंदींत ळ नाहींत, मूळ अपभ्रंशांतील हा ल उच्चारतां न आल्यानें मराठींत या वर्त्स्य ल चे ळ व अहिराणींत य असे तर रूप झालें नसावें ना अशी शंका येते. वऱ्हाडी अहिराणींत या वर्त्स्य ल चा ड झाला (जडगांव जलग्राम) मूळ संस्कृतांत शब्दांतर्गत असयुक्त ल च्या बाबतींत ही प्रक्रिया दिसून येते. संस्कृत- नलिका मराठी- नळी अहिराणी- नयी व अहि - नडी चा फ्रेंच भाषेत य उच्चार होणारीं उदाहरणें. Muille इटालियन KUELLI

अहिराणींत य् शब्दारंभी तत्सम शब्दांतच आढळतो. यम यमुना इत्यादि. य हा संस्कृत वेदना वेलि प्राकृत वेअणा वेलि या शब्दापासूनहि आलेला आहे. येना येल. प्रथम य याचा उच्चार अनौष्ठ्य – वे उच्चारांतून निर्माण झाला असावा. वेअणा यांतील व चा लोप होऊन एअण्णा असा उच्चार अस्तित्वांत आला असावा व पुन. य या व्यंजनाचा आसरा घेतला असावा अशी दुसरीहि शक्यता आहे. हीच विचारसरणी इतर ग्रामीण मराठीतील प्रवृत्ति लक्षांत घेतां संयुक्तिक आहे

र ऱ्ह मृदुघोष ध्वनि.

अहिराणी र हा दन्तमूलीय आहे. संस्कृत र हा मूर्धन्य आहे. मावळींतील अगर नगरींतील र उच्चारतांना जिभेचा झंकार स्पष्ट जाणवतो. तसा झंकार अहिराणी र उच्चारतांना प्रत्ययास येत नाहीं जिभेचें टोंक दंतमूलास स्पर्श करतें अहिराणीत कंप मात्र नाममात्रच. * म्हणूनच अहिराणी र ला उत्क्षिप्त- वर फेकलेला किंवा ताडित (ELAPPED) असें संबोधलेलें आहे.

ऱ्ह हा र चा महाप्राणध्वनि आहे समस्थितींतील शब्दांत ऱ्ह र या दोन ध्वनींच्या योजनेमुळें भिन्नार्थ निष्पत्ति होते. ऱ्ह चा उच्चार संयुक्त नसून मिश्रसाधा आहे. मागील स्वर एक मात्रक असल्यास पुढील ऱ्ह मुळें द्विमात्रिक होत नाहीं.

---

* शेळ्या मेंढ्यांना हुसकावतांना हर्र हुर्र शब्दांतील र् मात्र झंकारी आहे.

र न्ह हे आदि मध्य अन्त्य स्थानी येऊं शकतात. उदा.—

| | |
|---|---|
| रानी— राणी | न्हानी— राहणी |
| रास— ढीग. | न्हास— राहतो |
| करोड- कांटी. | कन्होउ- उंच ढीग. |
| कराड- ताप. | कन्हाड- गांवाचे नाव. |
| सरी— गळ्यांतील दागिना. | सन्ही— सरेल. |
| करा— करा. | कन्हा— मृण्मय कुंभ. |
| पुराने- जुनें | पुन्हानें- बैलास टोंचण्याची काठी. |
| गिरन- गिरणी. | गिन्हन- ग्रहण. |

ल् ल्ह् मृदु घोष ध्वनि.

जेव्हां जिव्हाग्राचा दंतमध्यभागास स्पर्श होतो तेव्हां ल ध्वनीचीं निर्मिति होते. ल्ह हा ल चा महाप्राण असून त्याचा उच्चार मिश्रसाधा आहे. ल ल्ह हें दोन्ही आदि मध्य अन्त्यस्थानीं येतात. ल्ह मागील स्वर एकमात्रक असल्यास द्विमात्रक होत नाहीं. ल ल्ह ला नासिक्य संयोगांत येते. ल ल्ह उच्चारताना हवा जिभेच्या कडांवरून वाहते.

समस्थितीतील शब्दात केवळ ल् आणि ल्ह् या दोन ध्वनियोजनेमुळें भिन्नार्थ प्रतीत होतो.

| | |
|---|---|
| लानी— शेवटचे पीक. | ल्हानी— लहान स्त्रीलिंगी रूप. |
| फुलां— कानांतील दागिना. | फुल्ही-— फुलेल. |

ल्ह पुढें स्वर नसताना ल्ह मधील ह् अघोष असतो.

याशिवाय बागलाणींत लाडशिक्कींत ळ् ळह ध्वनि आहेत. ळ हा मराठी ळ प्रमाणेंच पूर्वमूर्धन्यभागीं जिभेच्या स्पर्शानें निर्माण होणारा ध्वनि प्रतिवेष्टित ध्वनि (RETROFLEX) आहे. ळह हा ळ चा महाप्राण आहे. ळह चा उच्चरहि मिश्रसाधाच आहे. ळह व्यंजनान्त असतांना अघोष असतो. शब्दांशब्दांत समस्थिति असतांना केवळ या दोन ध्वनियोजनेंमुळें भिन्नार्थ प्रतीत होतो.

| | |
|---|---|
| पळे- पळालें. | पळहे— कपाशीचें शेत. |
| पळो- पळो. | पळही- पळेल. |
| बळो- बळी | बळही- जळेल. |

ळ आणि ळह हें शब्दारंभी कधींच येत नाहींत.

पावरींतहि ळ्, ळह आहेत. शब्दारंभी मात्र तेहि येत नाहींत. अहिराणींत मराठीत शब्दांत जेथें ड ढ येतात तेथें पावरीत अनुक्रमें ळ ळह येतात. शब्दांतर्गभाशीं

असंयुक्त असतांनाच ही प्रक्रिया संभवते. ळ ळह् हें देखील पूर्वमूर्धन्यच आहेत पावरींतील ळ ळह् देखील भिन्न ध्वनि आहेत. पाली व वैदिक भाषेंतहि विकल्पानें ड ढ याऐवजी ळ ळह ध्वनि वापरलें गेल्याची उदाहरणें आहेत याच ड ढ ऐवजी पूर्व हिंदी बिहारी बंगाली आसामी भाषेंत व कुलाबा वगैरे कोंकणी भाषेंत र ऱ्ह असा उच्चार होतो. पावरीचें वैदिक व पाली भाषेशीं या बाबतीत दिसणारें साम्य विशेष चिंतनीय आहे.

वऱ्हाडी अहिराणीत शब्दान्तर्गत असंयुक्त ल बद्दल ड येतो. जलग्राम जडगांव. शाला — शाडा इत्यादि.

व् व्ह् द्वयोष्ठ्य घोष मृदु अर्धस्वर

दोन्ही ओठांच्या साह्यानें व ध्वनीची निर्मिति होते मध्यभागी हवा जाण्यास मार्ग राहतो ओष्ठ संवा स्पर्श करतात यात काही भाषेंत जसा ओठांचा चंबू करावा लागतो तसा चंबू करावा लागत नाही. इंग्लिश दन्तौष्ठ्य व हून हा निराळा ध्वनि आहे आपल्याकडे असा दन्तौष्ठ्य, ध्वनि असल्याबद्दलचा उल्लेख पाणिनीनें केलेला आहे अर्धमागधीत दन्तोष्ठ्य व व आहे दाताचा ओठाशीं संबंध येत असल्यानें घर्षकत्व अधिक असते.

व्ह हा व चा महाप्राण आहे. मात्र हा दन्तौष्ठ्य ध्वनि आहे. त्यामागील स्वर एकमात्रक असल्यास द्विमात्रक होत नाहीत. अहिराणी व उच्चारताना अल्प घर्षकत्व प्रतीत होते. मात्र व्ह चा उच्चार करतांना चांगलें घर्षकत्व प्रतीत होतें. व व व्ह हें आदि मध्य अन्त्यस्थानीं येऊं शकतात.

व व व्ह हे दोन वेगळाले ध्वनि आहेत

वान — वायन वर्ण. व्हान — वहाण.

वट — गाडी उतरणीवर सरकू नये यासाठी गाडीच्या चाकाच्या दिलेला टेका. व्हट — ओठ.

पावना — पाऊण पाव्हना – पाहुणा.

कवय — केळीचा लोंगर, कव्हय – केव्हा

चावरे — चावणारें, चाव्हर – चार दोऱ्यांचा बनविलेला दोर.

आवडी — आवडणारी, आव्हडी – एवढी,

लाव — प्रेम खाणारी. लाव्ह् – दाह.

माव — वेगळी प्रीति, माव्ह् – माघ.

व्ह् पुढें स्वर नसतांना व्ह तील ह हा अघोष असतो. उदा – लाव्ह्, माव्ह् इत्यादि. हा दन्तोष्ठ्य ध्वनि आहे

संस्कृतांतील व, इ, ई अगर ए शी अन्वित असतांना व अहिराणींत उतरतांना व अंतर्धान पावतो व प्रसंगीं केव्हा केव्हा य यजनागमनाची अगर शब्दान्तर्गतभागी य श्रुतीची मदत होते.

मराठीच्या इतर ग्रामिण भाषेंतहि हाच आढळतो

नवधारी मवमाय सवमार इत्यादि शब्दांतील व हा वस्तुतः अर्धस्वरच आहे. तो शब्दारंभीं येणाऱ्या व प्रमाणें व्यंजनात्मक नाही तदनुसार उच्चारण पद्धतीहि किंचित भिन्न आहे. ज्या मराठीत सउसार सवमार अशा तऱ्हेची कित्येक रूपें आढळतात. त्या-वरून व च्या अर्धस्वरात्मक स्वभाव धर्माबद्दल खात्री पटेल. अहिराणीत द्विस्वरयुतीत व क्वचित त्रिस्वरयुतीतहि या अर्धस्वराचें अस्तित्व प्रकट होते.

कांही अडाणी ग्रांथिक भाषेचें अनुकरण करण्याच्या नादांत बिच्छा विलाज असें उच्चार करतात. व व्यंजनागम हा निरर्थक आहे हें उघड आहे.

श् अघोष वर्त्सतालव्य सीत्कारी घर्षक ध्वनि

संस्कृत श शुद्धतालव्य समजला जातो नंदुरबारी श हा शुद्धतालव्य ध्वनि आहे अहिराणी श हा नंदुरबारी गुजराती श पेक्षां सौम्य घर्षक आहे. अहिराणींत या श ऐवजीं स हि येऊं शकतो. तथापि सम ाथतींतील कांहीं शब्दांत केवळ स व श या ध्वनियोजनेमुळे वेगवेगळाला अर्थ प्रतीत होतो. आदि मध्य अंत्य स्थानीं ते वावरू शकतता

| | |
|---|---|
| शाना — शाहणा. | साना — कोनाडा. |
| शाल — लोंकरीचें वस्त्र. | साल — वर्ष. |
| शाप — शाप. | साप — साप. |
| कशा — कशा प्रकारच्या. | कसा — कसा एक प्रकारची लांबट पिशवी. |

भिल्ल लोकांच्या अहिराणीत श ऐवजी स च येतो.

श उच्चारताना जिव्हाग्रद्वारा जिव्हापट दतमूलाच्या मागील भागास स्पर्श करते मात्र हवा जाण्यासाठीं संकोचित मार्ग असतो. त्यामुळे घर्षकत्व प्रतीत होते. जिव्हापट आकुंचित पावते. बागलाणीत लाडशिक्कीत तालव्य स्वराशीं इ ई ए य शी अन्वित असतांना स चाहि वर्त्सतालव्य उच्चार होतो.

अहिराणींत श बद्दल स हा अनियमितपणें येतो. भिल्लीन व पावरीत मात्र सर्वत्र ऐवजी श च आढळतो. ×

—

दंतमूळांना सुरूवात होते त्या ठिकाणी जिभेच्या टोकाचा स्पर्श होतो. व जिभेच्या कडा बाजूच्या दातांना थोड्याशा स्पर्शतात. अग्र किंवा पूर्व दंतमूळांना स्पर्श पूर्णपणें नसतो सकुंचित निरुंद मार्गातून हवा घर्षण करून निसटू शकते. हा सीत्कार आपण हवा तेवढा लांबवूं शकतो. संस्कृतात यांना ईषत् स्पृष्ट किंवा उष्म म्हणतात. स् श् ष् ह्यांच्या उच्चारांच्या वेळी वागिंद्रिय जरासें टाळूस लागलेले असते. उष्म म्हणजे प्रखर उच्चारांचे भिल्लीतील स् दंतमध्यभागास स्पर्श करून निर्माण होतो व सीत्कारहि अहिराणी पेक्षां अधिक काळ टिकतो.

मालेगांवीं मुसलमानांच्या बोलींत वत्स्र्य झ हा विशिष्ट घर्षक उच्चार आढळतो. दंततालव्य झ हून भिन्न असा आहे अहिराणींत त्याचे दंततालव्य उच्चार होतात. मिजास बाजार इत्यादि ह् महाप्राण ध्वनि.

ह चा अंतर्भाव कोणी उष्म वर्गात करतात स्वरनाली — भिवरांत ह ची उत्पत्ति होते. ह् चे घोष व अघोष असे दोन प्रकार आहेत. उच्चारतांना श्रुतिगम्य घर्षकत्व तीत होते. शब्दारंभी अगर शब्दांतर्गत भागोहि स्वरमिश्रित असल्यास तो घोष असतो. शब्दांती मात्र हा नाद कमी होत जातो शब्दांतीं पुढे स्वर नसल्यास तो अघोषच समजावा. उदा — लाव्ह्, माव्ह् कठोर व्यंजन मिश्रित हे अघोषच समजावा उदा.– ख फ इत्यादि शब्दांतीच्या या कठोर महाप्राणांतील ह कार बऱ्याच वेळां अंतर्धान पावतो सूक, दूक हुभा इत्यादि अहिराणीचें स्थान ग्रांथिक मराठी वा कोंकणी यच्या-मधील आहे. कोंकणींत अन्त्य स्थानी मृदु कठोर महाप्राण ह चा पत्ता नसतो उलट ग्रांथिक मराठींत अन्त्यस्थानच्या कठोर महाप्राणाचा उच्चार स्पष्ट ऐकू येतो अहिराणींत कठोर महाप्राण व्यजनांतील ह चा उच्चार इतका नरमावलेला मंद असतो की, भिल्ली भाषेंत कठोर महाप्राण व्यजना ऐवजी फक्त कठोर अल्पप्राण व्यंजनच ऐकू येतें ग्रामीण मराठींतहि कठोर अल्पप्राणच कठोर महाप्राणाऐवजीं ऐकू येतो मात्र कांहीं वेळेस मागील अक्षरांत मिसळतो उदा.— फुड – प्रथम. याबरून एकट्या ग्रांथिक मराठी खेरीज ठणठणीत कठोर महाप्राण व्यंजनोच्चार महाराष्ट्राच्या परिसरांतील कोणत्याहि ग्रामीण भाषेंत नाहीं हें दिसून येईल.

---

× बागलाणी भिल्लीत आद्य छ् बद्दल स् ध्वनि येतो छत् > शत छातो > शाती.

अहिराणींत ह हा ह (ऽ) उचकीध्वनि पेक्षां निराळा असतो. तत्समांत विसर्गाचाहि ह च होतो. राम हा राम अनेकवचनी शब्दांत विसर्गाऐवजीं ह् कार उचको स्वरुपाचा आहे. उदा.— रामाहाऽ देवोहिऽ

पुन: याचा उच्चार पुन्हा असा होतो त्यामागील स्वर द्विमात्रक होत नाही.

कांहीं ठिकाणीं ह चा वर्णागम या दृष्टीनेंहि उपयोग होतो शब्दांची सुरवात स्वरानें असेल व पुढें ख घ इत्यादि महाप्राण व्यंजनें अगर ष श स इत्यादि आले असतील तर स्वराऐवजी ह कारानें सुरवात होते. हुबा - उर्ध्व उष्म. हूट - उष्ट्र. क्वचित् अ आ स्वरानें सूरवात झालेल्या शब्दारंभीहि येतो हाय (आवलि)

वऱ्हाडी अहिराणीत इतरत्रहि अनपेक्षितपणें ह् येतो.

काहाडन वहाश दहाड.

**अहिराणी स्वरव्यवस्था –**

अहिराणीन अ अ– अ' अऽ अॅ उ, ऊ ए‿ ओ‿ ओ ओऽ हे स्वर आहेत

स्वरांचे तीन प्रकार मानलेले आहेत. (१) अग्र (२) मध्य (३) पश्च. जिभेच्या पुढील मागील टाळूकडे जाऊं पाहणाऱ्या भागावरून अशीं नावें युरोपीयन ध्वनि-कोविदांनीं ठेवलेली आहेत. डानिएल जोन्स यानें एकूण ८ जागा प्रत्येक प्रकारच्या स्वराच्या अतीम हालचालीवरून निश्चित केलेल्या आहेत. त्यांना कार्डिनल व्हावेल-अंतिम स्वर म्हटलेले आहेत. त्याचेहि पुन: प्रकुचित- (ROUNDED) स्वर अप्रकुचित किंवा विस्तृत (UNROUNDED) स्वर भाग पाडलेले आहेत. त्यांतहि पुनः उंच मध्य नीच किंवा बद व खुले किंवा (स्पर्शलक्षी) अर्धस्पर्शलक्षी अर्धमुक्त मुक्त असे प्रकार पडतात. ऊ हा पश्चस्वर तर ई हा अग्रस्वर मानला जातो. तथापि कांहीं भाषेंत उदा. जर्मन ई पश्चस्वर व ऊ अग्रस्वर उच्चार अस्तित्वांत आहेत. या स्वरमालेंत कितीतरी पुनः संयुक्त स्वर येऊं शकतात या स्वरांनाहि पुनः उच्चारणस्थानावरून कंठ्य, तालव्य, ओष्ठ्य संबोधले जाते. अ कंठ्य तर ई तालव्य ऊ ओष्ठ्य मानतात व्यंजनाप्रमाणें प्रत्येक उच्चारण स्थानाशी स्पर्श होत नाहीं. तथापि उच्चारण स्थानाशी स्पर्श करण्याची प्रवृत्ति मात्र स्वरोत्पत्तीच्या वेळेस भासते. स्वराचें उच्चारणस्थान न बदलतांनाहि उच्चारणकाल लांबवितां येतो. या स्वर लांबीला तशी मर्यादा घालताच येत नाहीं. आपण सोयीसाठीं ऱ्हस्व इ दीर्घ ई म्हणतो. तथापि मधें कितीतरी टप्पे असू शकतात. त्यातहि पुनः स्वरांचे आरोह व अवरोह असे कांहीं भाषांत आढळतात, खंडित निम्नखंडित त्याच स्वरांचा उच्चार करतां येतो. बे चा पाढा म्हणतांना बेऽ एकऽ बे‿एऽ यांतील दुसऱ्या बेच्या उच्चारावरून दिसते. ग्रामीण मराठी आ हा निमखंडित आहे.

स्वरप्रक्रिया दोन प्रकारच्या असतात (१) स्वरांचे स्वरूपच सभोवारच्या परिस्थितीमुळें ( QUALITATIVE ) म्हणतात. अहिराणींत नक्षत्र अक्षन् याचा नखेत्र अख्खेदा असा उच्चार आढळतो गुणवृद्धि फरक यांतच मोडतात (२) स्वरकाल वा स्वरमात्रा प्रक्रिया ( QUANTITATIVE ) ऱ्हस्व स्वर दीर्घ होणें हे फरक या प्रक्रियेंत समाविष्ट होतात. * सर्व स्वर व संयुक्त स्वर यांचा नासिक्योच्चार होणें शक्य आहे. नेहमीच्या बोलण्यांत ऱ्हस्वदीर्घांचा काटेतोल नियम नसतो. तथापि शब्दांत स्वराच्या ऱ्हस्व दीर्घत्वामुळेंहि अर्थभिन्नता होऊ शकते.

अ इ उ हे नेहमी ऱ्हस्व तर अ—अऽ, आ ऊ ए ओ हे नेहमीच दीर्घ मानले जातात.

ई— ई चा उच्चार करतांना जिव्हापृष्ठ कठोण वाळूच्या दिशेनें उचलले जाते. मात्र स्पर्श होत नाही व घर्षकत्वहि प्रतीत होत नाही. वरच्या दाताचा अल्पस्पर्श जिव्हापटाच्या कडांना अल्प जाणवतो. अंतिम ई स्वरा खालीं याचें स्थान आहे. दु-अक्षरी शब्दांत अग्री य असतो तर त्रयाक्षरी वा बोलण्यात मध्याकडे झुकलेला आढळतो दु-अक्षरीं शब्दांतील ई चा उच्चार करताना अडाणी लोक ओठ इ पेक्षा अधिक फैलवतात अहि उदा.- भीत् चीत ही! ही! भीत्ले दीसन ( देऊन ) इत्यादि इ- ऱ्हस्व स्वर. स्वरनिर्मिति वरील प्रमाणें पण अल्पकाळ अस्तित्व उदा– भिताडी, चितार एऽ अंतिस्वरापेक्षा खालचे स्थान हाक मारतांना दीर्घत्व प्रतीत होते एऽ रामा पाढे म्हणतांना तेरा एकऽ ते ऽरा बेऽ दीर्घत्व प्रतीत होते.

अग्र जिव्हापटाचा उंचवटा इ ई इतका नसतो तथापि अ उच्चारतांना जिभेची जो परिस्थिति असते त्यापेक्षां उंचवटा केव्हांहि अधिक असतो.

ए॒ हा लघुस्वर मानावा के आणि इग्लिश मेन् मधील मे मधील ध्वनि ए॒ सारखेच आहेत. ज्ञानेश्वरी अहि. पदातील क वो अद्वैत माले. यांतील क चा उच्चार असाच असावा.

ॲ गॅ (गेला) सारख्या एकाक्षरी शब्दांत याचें अस्तित्व दिसते तसेंच परकीय भाषांतील उच्चारांतहि आढळतो. उदा. कॅम्प, बॅंक, कॅट मराठींत ॲ साठीं ग्या क्या, ब्या अशी ध्वनिचिन्हें वापरतात.

---

* स्पर्श व्यंजनाखेरीज इतर व्यंजनांत मात्रा प्रक्रिया संभवते. (अन्नान्न) कल्लोल तथापि दीर्घ व्यंजनें संबोधण्याऐवजीं द्वित्तच संबोधणें इष्ट. स्पर्शद्वित्तांत त्रुटितपणा आघात जाणवतो. त्यांना दीर्घ व्यंजन म्हणतां येत नाहीं.

ऊ ओष्ठ्यध्वनि उच्चारतांना दोन्ही ओठ प्रकुंचन पावतात. पण ते या साठीं अति पुढें येत नाहींत. गुजराती उच्चाराशी ताडून पहा. या चें स्थान अंतिम स्वर दु च्या खालीं दुअक्षरी शब्दात व एकाक्षरीं शब्दांत हा आढळतो एकवचनी प्रत्ययाच्या वेळीहि उच्चारांत बदल होत नाहीं. उदा. कूय् कूय् ले, भू. जलद भाषणांत हा स्वर विसरतो. केव्हां केव्हां ऱ्हस्वत्व पावतो.

आऽ अर्धसंवृत्तश्री स्वर (बंद) उ पेक्षा याचें स्थान खालीं असते. एकाक्षरी व दु- अक्षरी शद्बांत याचे अस्तित्व जाणवते शद्बांती हि तो येतो. उदा- नागोऽ हाक मारतांना दीर्घत्व प्रतीत होते. ओऽ उच्चारतांना ओठांचे प्रकुंचन उ पेक्षां कमी असते.

ओ— मराठी ओ शीं जुळता आहे दु अक्षरी शद्ब स्वरांत असतांना विशेषत: दीर्घ स्वरान्त असतांना हा आढळतो बव्हाक्षरी शद्बांत आदि मध्य अन्त्य स्थानीं येतो.

गोऽड् पण गोड
सोऽड् पण सोडा

ओ अहिराणीत हा स्वर कांहीं एकाक्षरीं शद्बांच्या अन्त्यस्थानीहि येतो. जलद बोलण्याच्या ओघांत केव्हां केव्हां बंगाली ओ ˇ प्रमाणेंच अल्प व्यंजनत्व प्रतीत होते. मांडो ˇ ( मडा ) पल्लो (पल्लव) स्टो (स्टोव्ह) भो, बायको ˇ आद्यस्थानी असलेल्या आघातामुळें याला ऱ्हस्वत्व आलेले दिसते. मात्र गुजराती आद्यस्थानीय ओ पेक्षा याचें स्थान वरचे आहे अंकलेश्वरी गुजराती सोनी (शॉनी) उच्चाराशीं ताडून पहा. हा अर्धमुक्त स्वर आहे.

आ— हा उच्चार मध्याकडे झुकता आहे. कारण प्रकुंचन नसतेंच मुळीं. मात्र ओठहि विस्तृत नसतात अ पेक्षां अधिक खुला स्वर आहे हें ओंठांच्या विलगत्वाच्या स्थितीवरून दिसून येईल.

अंऽ हाहि अनौष्ठ्य पश्चस्वर पण मध्यस्वराकडे झुकता स्वर आहे मध्यस्वर अ च्या वर याचें स्थान असून मराठींत करनं, बोलनं, देनं, माझं, तुझं यांतील अं अशाच प्रकारचा आहे. मात्र शब्दांत व्यंजनाची समस्थिती असतांना या स्वर योजनेमुळें

---

× अहिराणींत ओष्ठ्य अग्रस्वर ' वायू ' वाउ ( वाळू ) सारख्या उच्चारांत आढळतात. उदा- विविध — इइध. विद्या — इद्या. ह्यांतील इ ओष्ठ्य अग्रस्वर उच्चारा मार्फतच आलेल्या असावी.

अर्थभेद होतो. हा ए़ ओ़ प्रमाणेंच शब्दांन्ती फक्त येतो. कयऽ, दिवऽ, सांगऽ फयऽ इत्यादि.

**अः —** नेहमीचा मराठीशीं जुळता मध्यस्वर. जीभ उंचावत नाही सपाट स्थितीत असते हा आदि मध्य अंत्यस्थानी येऊं शकतो.

**अ —** हा दु अक्षरीं शब्दात प्रामुख्यानें येतो. नेहमीचा अ लाबवून हा स्वर निर्माण होतो. त्यामुळें जलद भाषणात त्याचें दीर्घत्व नष्ट होते. श्री. कान्हेरे यांनी यालाच अनौष्ठ्य पश्चस्वर म्हटलेले आहे. उदा — ज-ग् तथापि अहिराणीत त्याचें स्वरूप वरील प्रकारचे आहे. अर्थच्छटा बदलूं शकणारे हें दीर्घत्व असू शकतें. उदा.- घ-र् घरांत. घर–घर.

**अ० —** अहिराणीत हा लघुतर स्वर. हा लाव्ह्, माव्ह् उच्चारताना व ह् अनाघातमय असताना अ० असा अस्पष्ट अघोषध्वनि ऐकू येतो.

**संयुक्त स्वर —**

केव्हां केव्हां शब्दावयवांत ( SYLLABLE) दोन स्वर जवळ जवळ एकदमच उच्चारले जातात. ऐकणाऱ्यास ह्या दोन स्वरांची जाणीव होत नाहीं सामान्य श्रोत्यांना तो एकच स्वर आहे असा भास होतो. अशा प्रकारच्या स्वरांना संयुक्त स्वर म्हणतात. वागिंद्रिय एका स्वराच्या उच्चाराच्या वेळेची उच्चारणस्थान दिशा एकदम बदलून त्याच क्षणीं त्याच दमांत व त्याच चालनेचें दुसऱ्या उच्चारण स्थानाकडे वळण्याचा प्रयत्न करतें. अशा वेळीं संयुक्त स्वराची निर्मिति होते.

हे संयुक्त स्वर तीन प्रकारचे आहेत. (१) चढते (२) समबल (३) उतरतें.

दया वेळेस अवयवांतील दुसरा स्वर प्रबल असतो तेव्हां त्या एकजीव होऊं पाहणाऱ्या स्वरयुतीस चढता संयुक्त स्वर म्हणतात. इंग्लिशमध्ये दीर्घ स्वरांच्या अंती अशा प्रकारच्या संयुक्त स्वरांची उदाहरणें भरपूर आहेत

जेव्हां अवयवांतील दोन्ही स्वर समबल असतात तेव्हां त्या एकजीव होऊं पाहणाऱ्या स्वरयुतीस समबल संयुक्तस्वर म्हणतात.

जेव्हां अवयवांतील स्वरयुतीतील पहिला स्वर प्रबल असतो तेव्हां त्या एकजीव होऊं पाहणाऱ्या स्वरयुतीस उतरता संयुक्तस्वर म्हणतात. अहिराणींत तिन्ही प्रकारचे संयुक्त स्वर आढळतात. तथापि तिसऱ्या प्रकारच्या संयुक्त स्वरांची संख्या पहिल्या व दुसऱ्या संयुक्त स्वरापेक्षां अधिक आहे.

दिवाळींत आपण जळता बाण ठराविक दिशेनें फेकावा पण तो ठराविक ठिकाणी न जातां अकस्मात वाऱ्यामुळें दुसऱ्याच दिशेस वळावा व दुसऱ्याहि दिशेला न पोंचतांच मधल्यामधें विझून जावा अशी या संयुक्त स्वरांची स्थिति असते. वागिंद्रिय स्वरयुतीतील पहिल्या उच्चारण स्थानाची दिशा बदलून दुसऱ्या उच्चारणस्थानाप्रत पोंचण्यापूर्वीच गति थांबविते.

संस्कृत भाषेंत ऐ आणि औ हे संयुक्त स्वर मानलेले आहेत हे मूळ आर्यन भाषेंतील परंपरेनें आलेले संयुक्त स्वर नव्हेत प्राकृतांतहि या ऐ औ चे विभाजन अइ अउ झालेले आढळते. किंवा त्याची ए ओ ही प्रतिक्रिया झालेली दिसते मराठींतहि तत्सम शब्दाखेरीज इतरत्र आढळणारे ऐ आणि औ हे नव्यानेंच निर्माण झालेले आहेत. अहिराणीतही तत्सम शब्दांतील ए आणि औ चे स्वर विभाजन-- अइ अउ किंवा आइ आउ झालेले दृष्टीस पडते मात्र नव्याने ऐ आणि औ तर निर्माण झालेच पण इतरहि संयुक्त स्वर भरपूर आढळतात लाडशिक्की बागलाणी व सुशिक्षित अहिराणी भाषकांच्या बोलींत मराठी सारखेच शब्दांत विशेषतः तत्सम शब्दांत संयुक्त स्वर ऐ आणि औ आढळतात. शब्दातील व्यंजनदुवे निखळल्याने व वाक्यावर जोर देण्याच्या भरांत बोलण्याच्या ओघांत संयुक्त स्वररूप पावू शकणाऱ्या स्वरयुत्या भरपूर आहेत. ज्यावेळेस निकटवर्ती दोन स्वर वेगवेगळे पूर्णपणे उच्चारले जातात त्यावेळेस त्याना येथे स्वरयुति म्हटले आहे पण तेच जर एकजीव होऊ पहात असतील तर त्यांना संयुक्त स्वर म्हटलेले आहे. पुढील उदाहरणावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. मराठीत बैल यातील 'बै' संयुक्त स्वर आहे. पण अहिराणांत सामान्य माणूस एकटा बैल शब्द बईल असा उच्चारतो. म्हणजेच अ इ स्वरयुतींतील दोन्ही स्वरांचे विलगत्व जाणीत होते पण अहिराणीतील अनेक वचनीं उच्चार बय्ल असा आहे. मराठी उच्चार 'बै' शी बय् हा उच्चार ताडून पाहतां भिन्नत्व दृष्टीस पडते मात्र एका दमात दोन्हीहि उच्चारले जात असल्यानें दोन्हीहि संयुक्त स्वरच आहेत. त्याच्या उच्चारातील भिन्नता आघात व पुढील स्वर यावरहि अवलंबून आहे.

संयुक्त स्वररूपांप्रत जाऊ शकणाऱ्या स्वरयुत्या खालील प्रमाणें आहेत. बोलण्याच्या ओघांत विशिष्टार्थ बिबविण्याची वाक्यांतील कांही शब्दावर शब्दावयावर जोर देण्याच्या भरांत अहिराणीत संयुक्तस्वर म्हणून यांचा वापर केलेला आढळला आहे.

**अइ**— व्हइ (होळी) कइ (कवि) गुइगया (गूळदाळया)

**धइ** ल्या **धई**

अउ :— ([illegible]) [illegible] ([illegible]) [illegible] इत्यादि.

अय् :— बय् बय्!! (अबब) पूर्ण आज्ञार्थी लय् व्हय् (आण जा)
दय् (दळच)

अव् :— हव्शा, सव्सार, दव्दव् (दगदग) खव्दव् (दगदग)

आइ— ह्राइ (ही) धाइ (दहावी) न्हाइ (राहीलच)

आउ— ह्राउ (हा) वाउ (वाळू)

आय्— हाय् हाय् आय् व्हा (अविधवा अ: व)

आव्— खाव् खाव् सुटनी

आओ— जाओ म्या (जावो मेला)

इआ— मिकत (शिवी) बिआ (ह्यात ब्या शेतस) इआ विळा.

इइ— दिइ (लहान दिवा) मिइ मिळून शिइ (शिवी) इइ (विळी)
तत्सम इइरव भागाकार

इउ— भिउ (मना जीव भिउ भिउ करस) मी सारखी भितें.

इए— पिए (धुण्याचें पिळे) शिए (काव्या शिएच ना. कावळा शिवेना.)

इओ— शिओ म्या (शिओ मेला) ठिओ ठेवो.

इव्— इव्शी विविशी इव्शीकं थोडेशी

उअ— ठिव् (आज्ञार्थी) दुअक्षरी

उआ— फुआ (आतेचा नवरा) सुआ.
मोठी सोई जुआ (जुगार, जुआ)

उइ— उइ टिंगलदर्शक शब्द.
भुइ सुइ मुइ (मी मुइमुइ लडनु)
कुइकुइ मोटेचा आवाज, कोल्ह्याचें ओरडणें.

उए— मुए (मुळें) धुए (धुळें) २ धूत असे सुए.

उय्— कुय् (फूळ) खुय्खुय् (खुळखुळ)

**एइ—** जेइ, जेइसन्, लेइ, पेइ, ( जेएन, खाऊन, पिऊन )
तेइसावा ( तेवीसावा ) केइ ( केळीं )

**एय—** खेय् खेय् खेयना ( खेळ खेळला )

**एउ—** पेउ जेउ लेउ भेउ ( भीति )

**एए—** जेएना

**एओ—** जेओ ना जेओ जेवो न जेवो.

**त्रिस्वरयुति**

**अउइ—** मउइ ( मवळी ) कउइ ( कवळी )

**अइआ—** सआइ ( सहावी )

**इआउ—** मनमिआउ चाउ मिआउ ( सकाळची न्याहरी )

**ओइए—** जोईएना (पहावेना )

चारस्वर युतींची उदाहरणें दुर्मिळच. जोडशद्बांतून क्वचित दिसतात.

सहइआ — मैत्रिणिच्या सुना ( सह+उहू । उहूउहू थोडे थोडे टिपल दर्शक उद्‌गार उइउआ ( हळहुळा )